सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ४४ वें

ज्ञानेश्वर : चरित्र व तत्त्वविवेचन
( प्रथम खंड )

# ज्ञानेश्वरी-अंतरंग



प्रा. डॉ. रा. द. रानडे, एम्. ए., डी. लिट्.
यांच्या Mysticism in Maharashtra या ग्रंथाचा अनुवाद

★

अनुवादक
प्रा. कृ. वें. गजेंद्रगडकर, एम्. ए.



डिसेंबर, १९४८ ] [ मूल्य २॥ रुपये

प्रकाशक
कृ. वें. गजेंद्रगडकर
सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या
विश्वस्त मंडळाकरितां.
टिळक रोड, पुणें २

संपादक
आचार्य शं. द. जावडेकर
आचार्य स. ज. भागवत

मुद्रक
अमरेन्द्र लक्ष्मण गाडगीळ
'अग्रणी मुद्रणालय'
आनन्द चेम्बर्स, आंबराई, पुणें ४

# नानेश्वरी-अंतरंग

---

डॉ. गुरुदेव [illegible]

प्राध्यापक व [illegible] श्री ज्ञानेश्वरी

१९२० सालीं मुंबई विश्वविद्यालयांतील डॉ. [illegible] [illegible] 'भारतीय तत्त्वज्ञानाचा इतिहास' ही ग्रंथमाला [illegible]चें काम हातीं घेतलें. त्या वेळीं त्यांनीं मला "रिसर्च असिस्टंट" म्हणून नेमिलें. ग्रंथांक २ मधील 'उपनिषत्सार' व ग्रंथांक ७, 'महाराष्ट्रातील अनुभूतिशास्त्र' हे स्वतंत्र ग्रंथ लिहिण्यास त्यांनीं सुरुवात केली. ग्रंथांक ७ जरी १९२४ सालीं लिहून पुरा झाला, तरी तो १९३३ सालीं छापून प्रसिद्ध झाला. त्यास तावडतोब जगांतील उच्च वाङ्मयांत श्रेष्ठ स्थान मिळालें. व एका मिशनरी सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ लेखकानें तर एका त्रैमासिकांत "हा ग्रंथ म्हणजे ख्रिस्ती धर्मास हिंदुधर्मानें दिलेलें आव्हान आहे, व यास प्रत्युत्तर द्यावयाचें झाल्यास तितकीच गाढ विद्वत्ता, चोकसपणा, अनुभूति, शास्त्रशुद्ध व पद्धतशीर विचारसरणी आणि मांडणी इत्यादिकांची ख्रिश्चनधर्म–प्रतिपादनाच्या बाबतींत अत्यंत जरुरी आहे" असें लिहिलें. जगांतील सर्वधर्मीय विद्वान् लोकांना भारतीय, व विशेषतः महाराष्ट्रीय अनुभूतिशास्त्राचें महत्त्व पटावें म्हणून मूळ ग्रंथ डॉ. रानडे यांनीं इंग्रजींत लिहिला. त्याचा अनुवाद मराठींत करण्याविषयीं मीं त्यांना परवानगी विचारली व ती त्यांनीं मला मोठ्या आनंदानें दिली, याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. मी त्यांचा विद्यार्थी व अन्तेवासी म्हणून त्यांच्या सहवासांत सतत ४–५ वर्षें असतांना हा ग्रंथ लिहिला जात होता. त्या वेळीं त्यांतील सर्व मुद्द्यांचा ऊहापोह व विवेचन ऐकण्याची संधि मला मिळाली. त्यांच्या कृपेनेंच अनुभूति म्हणजे काय, मानसशास्त्रदृष्ट्या पारमार्थिक प्रगतीच्या पायऱ्या कोणत्या, परमार्थाचा पाया कोणत्या त्रिकालाबाधित सत्यावर रचिला आहे, याचें अत्यल्प पण स्पष्ट ज्ञान मिळविण्याची मला ही जी अमूल्य संधि मिळाली, त्याबद्दल मला धन्यता वाटते. संतांच्या वाङ्मयाच्या अनुवादाच्या कामीं मला याचा फार उपयोग झाला हें येथें नमूद करणें इष्ट वाटतें.

एकादी ओवी घुसडून फेरफार करील, तर तें अमृताच्या ताटांत नरोटी ठेवल्याप्रमाणें होईल ! म्हणून कोणींहि त्यांत बदल करूं नये असें एकनाथांनीं ब... ...से विकत सांगितलें आहे.

... ...शिवाय या मूळ ... ... तुकाराम व रामदास या पांचहि ...च्या ग्रथांतील तत्त्वज्ञानाचें विवरण आहे. यांपैकीं एकाद्या संताच्या ग्रंथाचाच अभ्यास करणाऱ्यास तसें पुस्तक घेणें गैरसोयीचें वाटेल; म्हणून या पांचहि संतश्रेष्ठांबद्दल गुरुवर्य रानडे यांनीं जें विवेचन लिहिलें आहे तें पांच स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध करावें अशी योजना मीं त्यांच्यापुढें मांडतांच तिला त्यांची संमति मिळाली. ही योजना खालीं दिली आहे:—

१ ज्ञानेश्वर:— चरित्र व तत्त्वविवेचन.

प्रथम खंड : ज्ञानेश्वरी—अंतरंग.

द्वितीय खंड : मूळ ग्रंथकाराची प्रस्तावना, भारतीय अनुभूतिशास्त्राचा विकास, अमृतानुभव, चांगदेवपांसष्टी, अभंग, इ.

२ रामदास:— चरित्र व तत्त्वविवेचन.

३ तुकाराम:— चरित्र व तत्त्वविवेचन.

४ नामदेवादि संत:— चरित्र व तत्त्वविवेचन.

५ एकनाथ, (भानुदास व जनार्दनस्वामी) :—चरित्र व तत्त्वविवेचन.

ही योजना गु. प्रा. रानडे यांच्या संमतीनें ठरविली आहे व यांतील सर्व पुस्तकांचा अनुवाद त्यांच्या परवानगीनेंच केला असून तो त्यांना पूर्णतया पसंत आहे. हीं सर्व पुस्तकें " सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें " या प्रकाशन-संस्थेमार्फत प्रकाशित करण्याचें ठरलें असून त्याबद्दल मी त्या संस्थेच्या चालकांचा आभारी आहें. यांतील पहिल्या पुस्तकाचा पूर्वार्ध " ज्ञानेश्वरी-अंतरंग " आज प्रसिद्ध होत आहे. ज्ञानेश्वरी व ज्ञानेश्वरीवरील मराठींत अद्ययावत् प्रसिद्ध झालेल्या सर्व ज्ञात ग्रंथांपेक्षां या

# विषयानुक्रमणिका

" ज्ञान..

प्रकारचें वाङ्मय .- पृ. १–७

विशेष गुण दिसून देतो. ज्ञानेश्व.....

ग्रंथकारांनीं जे अनेक पैलू पाडले आहेत, त्यांनीं [illegible] —ज्ञानेश्वरीचा

व उज्ज्वल झालें आहे यांत शंका नाहीं. परंतु या सर्वांपेक्षां हल्लीं आम्हीं प्रसिद्ध करीत असलेल्या 'ज्ञानेश्वरी–अंतरंगा'चा विशेष काय आहे, हें के. न. चिं. केळकरांची उपमा घेऊन, ती जरा जास्त विस्तारानें उपयोजून सांगतां येईल. ज्ञानेश्वरी हें एक भव्य व नितान्त सुंदर मंदिर आहे. हे सर्व लेखक अनेक प्रकारचे भक्त आहेत. यांपैकीं कांहीं मंदिराभोंवतीं प्रदक्षिणा घालतात, तर कांहीं या भव्य मंदिराचें वास्तुशास्त्राच्या दृष्टीनें अथवा शिल्पकलेच्या दृष्टीनें काय महत्त्व आहे हें वर्णन करितात; कांहीं त्यावर सुंदर काव्य रचतात, तर कांहीं दगडांची संख्या, लांबी, रुंदी, उंची, जाडी इत्यादिकांबद्दल सविस्तर व अचूक माहिती गोळा करण्यांत गुंततात. कांहीं हा मालमसाला कोठून, कोणाकडून, किती प्रमाणांत आणला, व खर्च किती झाला याचा शोध लावतात, तर किती मजुरांनीं किती वर्षें काम करून हें नित्य नवीन वाटणारें मंदिर उभारलें याकडेच कांहींचें लक्ष वेधलें आहे. कांहीं त्याच्या सांवलींत शान्तपणें बसून त्या शिल्पकाराचें व मालकाचें कौतुक करण्यांत मग्न झाले आहेत, तर कांहीं भाग्यवान् भक्तांना आपण देवदर्शनास आलों आहों याची जाणीव पूर्ण असल्यामुळें ते सर्व पायऱ्या चढून गाभाऱ्यांत शिरतात; पण आंतील देदीप्यमान् शोभा व रोषणाई पाहून त्यांचे डोळे दिपून जातात व देवापर्यंत त्यांची नजर जात नाहीं. याहिपेक्षां श्रेष्ठ भक्त थेट देवाच्या पायांजवळ जाऊन त्यांवर डोकें ठेवतात, व आत्मसमर्पणामुळें तद्रूपतेचा अमोघ, अलोट व अवीट आनंद सदैव उपभोगतात. गुरुवर्य रानडे यांचें ज्ञानेश्वरीवरील विवेचन जीवास अंतरंगाकडे खेचणारें व तेथील वैभव उघड दाखविणारें असल्यामुळें त्याच्या अनुवादास आम्हीं "ज्ञानेश्वरी–अंतरंग" असें यथार्थ नांव दिलें आहे. यांत ज्ञानेश्वरीचें अध्याय-क्रमानें विवेचन न करतां त्यांतील सर्व महत्त्वाचे मुद्दे तर्कशास्त्रदृष्ट्या रचून त्यांचें विवरण मानस-

नैष्कर्म्य प्राप्ति.—कर्म व ज्ञान.—कर्तव्य म्हणजेच ईश्वरी आज्ञा.—अनासक्त कर्माचरण.— कर्मफलाचा त्याग.—कर्मांचें ईश्वरार्पणत्व.—सत्त्व, रज, तमो[illegible]त, पासून उद्भवणाऱ्या त्रिविध मनोवृत्ती.—गुणत्रयाचा त्याग.—[illegible] व नीतिनियम उन्मूलन.

[illegible] लागते. हे सद्गुण कोणते [illegible]गुण कोणत टाकावे, हें कळलें म्हणजे मनुष्य परमार्थास योग्य होतो. परंतु परमार्थ, साक्षात्कार, सद्गुरूशिवाय केव्हांहि शक्य नाहीं, हें सर्व संतांचें स्पष्ट सांगणें आहे. सद्गुरूकडून नाम घेतल्यावर संतसंगति धरावी व नामस्मरण करावें म्हणजे प्रत्यक्ष देवाचा अनुभव येतो व तो जास्त कडक साधनेनें व गुरुकृपेनें वाढत जातो. या साक्षात्कारापासून होणारा आनंद अवीट आहे. त्यास दुसऱ्या कोणत्याहि आनंदाची उपमा देतां येत नाहीं. ईश्वराचें रूप अनंत आहे म्हणून या अनुभवास सीमा किंवा अंत नाहीं. त्यांत ज्याची प्रगति जास्त झाली असेल व ज्यास पूर्ण आत्मज्ञान झालें असेल, तो श्रेष्ठ. या दृष्टीनें पाहतां श्रीज्ञानेश्वरांइतके श्रेष्ठ संत या जगांत फारच थोडे झाले आहेत व त्यांच्या ग्रंथांत हा जो आध्यात्मिक अनुभव सांगितला आहे तो केवळ आत्मज्ञ गुरूनें दिलेल्या नामस्मरणानें मिळतो, इत्यादि परमार्थदृष्टीनें महत्त्वाच्या गोष्टी आहेत; व तत्संपादनार्थ तात्त्विक व नीतिमार्गाचें विवरण आवश्यक आहे. याच अत्यंत जिव्हाळ्याच्या अंतरंगीय मुद्द्यांचें विवेचन प्रस्तुत पुस्तकांत अत्यंत चिकित्सापूर्ण व तर्कनिष्ठुर पद्धतीनें व आत्मप्रचीति, गुरुप्रचीति व शास्त्रप्रचीतींच्या निकषांवर घांसून, ग्राह्य वाटतील तेच मुद्दे स्वीकारून सुसंगतपणें केलें आहे. या क्रमानें ज्ञानेश्वरींतील वेंचीव ओव्यांची रचना मांडून गुरुवर्य प्रा. रानडे यांनीं 'ज्ञानेश्वर—वचनामृत' प्रसिद्ध केलें, व त्यास विवरणात्मक प्रस्तावना जोडली. ही प्रस्तावना अपुरी वाटते व वचना-मृताची भाषा मूळ ज्ञानेश्वरीचीच असल्यामुळें ती कळणें कठिण जातें. म्हणून त्या वचनांच्या आधारावर त्यांनींच अत्यंत प्रासादिक, सुबोध व सुंदर भाषेंत ज्ञानेश्वरीचें जें सशास्त्र व विस्तृत विवरण केलें आहे, त्याचा अनुवाद मराठींत शक्य तितक्या सोप्या परंतु मूळ ज्ञानेश्वराच्याच भाषेंत करण्याचा प्रयत्न 'ज्ञानेश्वरी-अंतरंगां'त केला आहे. 'ज्ञानेश्वरी—अंतरंग' वाचतांना मूळ ग्रंथाची हरघडी आठवण होऊन मूळ ज्ञानेश्वरी वाचल्याचा

# निवेदन



अनु [illegible]

हे वा [illegible] भाऊ रानडे, एम्. ए., डी. लिट्., सेवानिवृत्त प्रमुख जातें. परंतु [illegible] त्यांना त्यांतील [illegible] अलहाबाद विश्वविद्यालय, अलहाबाद, यांनीं त्यांना हें "ज्ञानेश्वरी अंतरंग" मनरनी आवडलें असा [illegible] साहाय्यानें नित्य पारायणासहि हें 'अंतरंग' उपकारक ठरेल. मूळ ज्ञानेश्वरीच्या व विशेषतः गुरुवर्य प्रा. रा. द. रानडे यांच्या 'ज्ञानेश्वर–वचनामृता'चा अभ्यास करण्यास हें 'अंतरंग' उपयुक्त ठरेल अशी अपेक्षा आहे. या 'अंतरंग'वाचनानें मूळ ज्ञानेश्वरीच्या खोल अभ्यासाकडे वाचकांचें लक्ष वेधावें हाहि एक हेतु आहे. या अमोल, अप्रतिम व अद्वितीय ग्रंथाच्या वाचनानें खऱ्या परमार्थाकडे एका जरी वाचकाचें लक्ष वेधलें, व त्यास तो मार्ग चोखाळतां आला, तरी माझ्या श्रमांचें चीज झालें असें मी समजेन. माझ्या "उपनिषद्रहस्या"चें मराठी वाचकांनीं उत्तम प्रकारें स्वागत करून मला उत्तेजन दिलें याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्याप्रमाणेंच या 'अंतरंगाचें'हि ते स्वागत करतील अशी इच्छा प्रदर्शित करून हें अल्प निवेदन पुरें करतों.

नाशिक,
१२-९-४८

— कृ. वें. गजेंद्रगडकर

मूळ ग्रंथ ५००-५५० पानांचा बेंगळूर प्रेसमध्यें उत्तम प्रकारें व आधुनिक पद्धतीनें छापलेला आहे. त्याचा अनुवाद एकाच पुस्तकद्वारें प्रसिद्ध केल्यास तें पुस्तक तितकेंच मोठें होऊन सामान्य वाचकां[illegible]
घेणें अशक्यप्राय होईल, व वाचणेंहि कठिण जाईल [illegible] ९७
ग्रंथांत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ [illegible] मुकुटमणी ९७-९९

''ज्ञानेश्वरी-अंतरंगा''चा विशेष काय आहे, हें येथें थोडक्यांत सांगणें अप्रस्तुत होणार नाहीं.

[illegible]श्वरीसंबंधानें मराठींतून आजवर निरनिराळ्या ग्रंथकारांनीं विविध व आ[illegible] निर्माण केलेलें आहे. या प्रत्येक लेखकांत कांहीं ना कांहीं उपासक, अव्यक्त उपा[illegible] [illegible]श्वरीच्या स्वभावत: देदीप्यमान् हिन्यास या [illegible] अधिक प्रखर

शास्त्राच्या व अध्यात्मशास्त्राच्या पायावर केलें आहे. प्रथम बौद्धिक किंवा तात्त्विक दृष्टीनें अंतिम सत्य कोणतें हें ठरवून तें अंतिम सत्य अनुभवाच्या आवाक्यांत कसें आणतां येईल, याचा विचार येथें केला आहे. त्यास कांहीं १०९
संयम, तपश्चर्या किंवा योग व नीतिमार्ग यांची जरुरी असते …णत नाहीं ८०
पाळावे लागतात. अंतःकरणाची शुद्धीहि संपादावी … भक्तीनेंच ईश्वरप्राप्ति ८१
संपादावे व …

आनंद मिळावा, व आपण भाषांतर वाचीत नसून एक स्वतंत्र पुस्तक वाचीत आहों असें वाचकास वाटावें इतक्या सहज, साध्या व सफाईदारपणें सानुवाद करण्याचा आटोकाट प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे ज्ञानेश्वरीचा ... ठरवावें. ज्यांस मूळ ज्ञानेश्वरी वाचणें व समजून घेणें कठिण ... समजून घेण्याची मात्र तीव्र इच्छा असते, ...



# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | २० | नामार्थ फळभारानें | नानार्थफळभरानें |
| ५० | ७ | नागाची वद्य | नागाची व वद्य |
| ६८ | १३ | त्याप्रमाणें आयुष्य | त्याप्रमाणें दीक्षिताचें आयुष्य |
| ७४ | १४ | जागत | जाणत |
| ७५ | ३ | मनानें | मननानें |
| ७६ | १४ | निश्चित | निश्चित |
| ७६ | १८ | Aveunes | Avenues |
| १०२ | १ | पॅराबोला | हायपर्बोला |
| १०४ | २२ | देव, कान्त व भक्त, वल्लभा | देव कान्त व भक्त वल्लभा |
| १०९ | १५ | भक्तीनें | भक्तानें |

## ज्ञानेश्वरी-रचनेचा काळ व स्थळ

ज्ञानेश्वरांनीं स्वतः आपल्या ज्ञानेश्वरीच्या शेवटीं त्या ग्रंथाचा काळ व स्थळ यांचा निर्देश केला आहे. " गोदावरीच्या दक्षिण तीरीं, महाराष्ट्र प्रांतांत, त्रिभुवनांत अत्यंत पवित्र व जगाचें जीवनसूत्र असलेलें, ' महालया ' किंवा ' मोहिनीराज ' नांवाचें देऊळ आहे. तेथें यादववंशविलास श्रीरामचंद्र राजा राज्य करतो. तो सर्व कला व शास्त्रें यांचा आधारस्तंभ असून न्यायनिष्ठ असा जगाचा राजा आहे. त्याच्या कारकीर्दीत महेशपरंपरेंतील निवृत्तिनाथांच्या शिष्यानें, म्हणजे ज्ञानदेवानें गीतेस मराठी साज चढविला. शके १२१२मध्यें ज्ञानेश्वरानें ही टीका लिहिली व सच्चिदानंद बाबा मोठ्या आदरानें लेखक झाला." (ज्ञा., १८, १८०३–११.) यावरून ज्ञानेश्वरी इ. स. १२९०मध्यें लिहिली असें दिसतें. पुढें तीनशें वर्षें ज्ञानेश्वरीची हस्तलिखित प्रतच पिढ्यान्‌पिढ्या लोकांच्या वाचण्यांत आल्यामुळें तींत अनेक पाठभेद सहजच निर्माण झाले व मूळ प्रतींत नसलेला कांहीं भाग जोडण्यांत व मूळ प्रतींत असलेला कांहीं भाग गाळण्यांत आला असावा. पुढें इ. स. १५९०( श. १५१२ )मध्यें एकनाथांनीं ज्ञानेश्वरीची प्रमाणभूत आवृत्ति अत्यंत काळजीपूर्वक रीतीनें तयार करण्याचें काम हातीं घेतलें. तेव्हांपासून ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचें नवें युग सुरू झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वीं हा ग्रंथ अति शुद्ध होता, परंतु पुढें पाठांतरांत अशुद्ध झाला. तो शुद्ध करून, शोधून प्रसिद्ध करण्याचें काम एकनाथांनीं अत्यंत आदरानें हातीं घेतलें. त्यांनीं मूळ प्रतींत मुळींच फेरफार केला नाहीं. जरूर तेथें मोठ्या कुशलतेनें शुद्ध पाठ घातले व हल्लीं उपलब्ध आहे या स्थितींत ज्ञानेश्वरी प्रसिद्ध केली. ज्ञानेश्वरीसारख्या अप्रतिम ग्रंथांत जर कोणी

॰॰चून

## ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा

ज्ञानेश्वरीच्या उपसंहारांत ज्ञानेश्वरांनीं आपली गुरुपरंपरा दिली आहे, तिच्यांत दंतकथात्मक भाग मुळींच नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. कोणतीहि अध्यात्मपरंपरा ऐतिहासिक कालापलीकडे व स्मृतीच्या आवांक्याबाहेर नेली कीं, तिच्यांत कांहीं दोष राहणें अगदीं अपरिहार्य होतें. " एकदां श्रीशंकर अध्यात्मरहस्य पार्वतीस सांगत असतां, तें महासागरांतील एका मगरीच्या पोटांत दडून बसलेल्या मत्स्येंद्रनाथांच्या कानीं पडलें. या मत्स्येंद्रनाथांची व भग्नावयवी चौरंगीनाथांची सप्तशृंगीवर गांठ पडली. तत्क्षणीं तो सर्वांगीं संपूर्ण झाला. मग आपणास निर्विघ्नपणें समाधिसुख भोगतां यावें म्हणून मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथांस हें परमार्थरहस्य सांगून त्याचा सर्व लोकांत प्रसार करण्याचें सामर्थ्य त्यांस दिलें. गोरक्षनाथांकडून तें अद्वयानंदवैभव अशा गहिनीनाथांना मिळालें. जगांतील सर्व लोक अज्ञान व पापानें बद्ध झाले आहेत हें पाहून गहिनीनाथांना दया आली व त्यांनीं तें ज्ञान निवृत्तिनाथांना देऊन त्यांच्याकडे पुढील कामगिरी सोंपविली. " आदिगुरु शंकरापासून शिष्यपरंपरेनें थेट आम्हांपर्यंत आलेलें हें आध्यात्मिक गुप्त ज्ञान आम्ही तुला सर्वच्या सर्व देतों. त्याचा तूं स्वीकार कर व या जगांत कलीनें ग्रासलेल्या आर्त जीवांकडे धांवून जा व त्यांचें सर्व प्रकारें रक्षण कर. " अशी आज्ञा निवृत्तिनाथांना त्यांच्या गुरूंनीं दिली. आधींच स्वभावतः कृपाळू, त्यांत अध्यात्मगुरूंची आज्ञा; तेव्हां वर्षाकालांत मेघ खवळावा त्याप्रमाणें निवृत्तिनाथांचा उत्साह दुणावला व त्या मेघाप्रमाणें आर्त लोकांना शांत करण्यासाठीं त्यांनीं अध्यात्मज्ञानाचा वर्षाव केला व 'शांत' रसाचा प्रवाह वाहूं लागला. चातकाप्रमाणें ज्ञानेश्वरांना त्यांतील थोडेच थेंब घेतां आले व ते येथें भगवद्गीतेवरील टीकारूपानें प्रकट झाले आहेत. " (ज्ञा., १८, १७५१–६२.) येथें ज्ञानेश्वरांनीं आपली अध्यात्मपरंपरा दिली आहे, ती थेट शंकरापासून निघून मत्स्येंद्रनाथ,

गोरक्षनाथ, गहिनीनाथ व निवृत्तिनाथ या परंपरेनें ज्ञानेश्वरांपर्यंत आली व ज्ञानेश्वर हे निवृत्तिनाथांचे शिष्य होते, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ज्ञानेश्वरांच्या इतर लिखाणांत जे उल्लेख आले आहेत त्यांवरूनहि या परंपरेस दुजोरा मिळतो. ही गोष्ट खरी असली, तरी ज्ञानेश्वरीसारख्या अत्यंत महत्त्वाच्या ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या या उल्लेखाचें महत्त्व केवळ अद्वितीय आहे यांत शंका नाहीं.

## ज्ञानेश्वरांचा गुरूविषयीं आदर

ज्ञानेश्वरांचें अंतःकरण गुरुभक्तीनें इतकें उचंबळून येतें कीं त्यांना आपल्या गुरूंविषयीं वाटत असलेला नितान्त आदर वेळोवेळीं व्यक्त केल्याशिवाय राहवतच नाहीं. पहिल्या अध्यायांत श्रीगुरूंच्या गुरुकृपेनें संसारसागर तरून जाण्यास आपणास मदत झाली असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे. डोळ्यांत अंजन घातल्याबरोबर वाटेल तें दिसूं लागतें व गुप्त धनहि तावडतोब दिसतें; चिंतामणि हातीं लागला तर आपल्या सर्व इच्छा पूर्ण होतात; त्याप्रमाणें सद्गुरु निवृत्तिनाथांच्या कृपेनें व त्यांच्यामध्यें आपल्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या असें श्रीज्ञानेश्वर म्हणतात. झाडाच्या मुळाशीं पाणी घातलें तर तें सर्व शाखांना व पानांना पोहोंचतें; समुद्रांत स्नान केलें तर जगांतील सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य मिळतें; अमृतसेवनानें जगांतील सर्व स्वादिष्ट पदार्थांचें सेवन केल्यासारखें होतें; त्याप्रमाणें सद्गुरूची पूजा केली तर सर्व इच्छा पूर्ण होतात. ( ज्ञा., १, २२–२७. )

## गुरुकृपेस असाध्य कांहींच नाहीं.

सहाव्या अध्यायांत ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे कीं, " जें बुद्धीला आकलन करण्यास कठिण जातें, तें निवृत्तिनाथांच्या कृपाउजेडानें सहज कळतें. अतींद्रिय अध्यात्म–ज्ञान प्राप्त झालें असतां जें डोळ्यांस दिसत नाहीं तें डोळ्यांशिवाय दिसूं लागतें; परीस हातीं लागला, तर जें किमया करणाऱ्यांनाहि सांपडत नाहीं, तें सोनें लोखंडांतहि सांपडतें; त्याप्रमाणें एकाद्यावर गुरुकृपा झाली, तर त्यास काय अशक्य आहे ? ही गुरुकृपा आपल्यास अपार लाभली आहे असे धन्योद्गार ज्ञानेश्वरांनीं काढिले आहेत." ( ज्ञा., ६, ३२–३५. )

## गुरुकृपा अवर्णनीय आहे

गुरूचें वर्णन यथार्थ करणें अशक्य आहे असें ज्ञानेश्वर म्हणतात: "सूर्याच्या अंगास उटी लावणें, किंवा कल्पतरूला हार घालणें, किंवा कापुरास सुवास देणें, किंवा चंदनास चर्चिणें जसें अशक्य, त्याप्रमाणेंच गुरूचें वर्णन करणें अशक्य होय. अमृताचें पुनः शिजवून पक्वान्न करितां येईल काय? मोत्यास चकाकी येण्यासाठीं रंग देण्याइतकें किंवा सोन्यास रुप्याचा मुलामा चढविण्या-इतकेंच गुरूची स्तुति करणें अप्रयोजक आहे. म्हणून मौन धरून मूकपणेंच सद्गुरूस नमन करणें हें श्रेयस्कर होय." (ज्ञा., ९, ९–१५.)

## गुरुकृपेचें आवाहन.

श्रीसद्गुरु हे ज्ञानेश्वरांच्या विचारांचा सर्वस्वीं एकमेव विषय असून त्यांत ते कसे पूर्ण तल्लीन होतात हें त्यांनीं अनेक अध्यायांच्या आरंभीं प्रस्तावनेदाखल गुरुमहिम्याचें जें वर्णन लिहिलें आहे त्यावरूनहि सिद्ध होतें. उदाहरणार्थ, बाराव्या तेराव्या, चौदाव्या व पंधराव्या अध्यायांच्या आरंभीं त्यांनीं सद्गुरूची कृपा भाकिली आहे. बाराव्या अध्यायाच्या आरंभीं सद्गुरूंच्या कृपादृष्टीनें विषयरूपी सापाच्या दंशानें आलेली मूर्छा निर्विष कशी होते, हें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे. "तुझ्या कृपाप्रसादाचा पूर लोटल्यावर संसारताप आम्हांस कसा पोळेल किंवा जाळील? गुरुमाउली आपल्या शिष्यास आधारशक्तीच्या मांडीवर कौतुकानें वाढवून व हृदयाकाशांतील पालखींत त्यास निजवून स्वतः झोके देते. ती त्याच्यापुढें आत्म-ज्योती ओंवाळून मन–पवनाचीं खेळणीं करते व आत्मसुखरूपी बाळलेणीं त्याच्या अंगावर घालते. सत्राव्या कलेचें अमृतपान देऊन, अनाहत नादाचा खुळखुळा ती हातीं देते व आत्मज्ञान समजावून देऊन समाधिसुखांत निजविते." ज्ञानेश्वर मराठी भाषेचे खरे प्रेमी होते. म्हणून "तुझ्या कृपेनें मराठी सारस्वतांत आत्म-ज्ञानाचें पीक वाढीव" अशी विनवणी त्यांनीं आपल्या गुरूंस केली आहे. (ज्ञा., १२, १–९.) 'सद्गुरुस्तवन म्हणजे सर्व विघ्नांच्या नाशाचें आदिकारण असून त्याच्या नुसत्या स्मरणानें सर्व शब्दसृष्टि स्वाधीन होते; व बोलण्यांत इतका गोडवा येतो कीं, त्यापुढें अमृत फिकें पडतें' असा तेराव्या अध्यायाच्या

आरंभीं ज्ञानेश्वरांनीं आपल्या गुरुस्तवनाचा महिमा वर्णिला आहे. ( ज्ञा., १३, १–५ ) चौदाव्या अध्यायाच्या आरंभीं सद्‌गुरूंस ज्ञानेश्वरांनीं 'प्रज्ञाप्रभातसूर्य' म्हटलें आहे. त्याचा उदय झाला असतां विश्वाभास नाहींसा होतो व तो लपला तरच हें विश्व प्रकट होतें : " क्षितिजावर सूर्य उगवला कीं चंद्र निस्तेज काजव्यासारखा दिसतो, त्याप्रमाणें गुरुकृपेचा उदय झाला कीं सर्व शास्त्रें निस्तेज होतात. गुरुमहिमा शब्दांनीं वर्णन करणें कधींच शक्य नाहीं. म्हणून स्तुति सांडून निवांतपणें त्याच्या पायीं डोकें ठेवणें हीच त्याची यथार्थ स्तुति होय." ( ज्ञा., १४, १–१६.) पंधराव्या अध्यायाच्या आरंभीं ज्ञानेश्वरांनीं गुरुकृपेचें रूपकात्मक वर्णन दिलें आहे : "आतां मी आपल्या हृदयाचा सद्‌गुरूस बसण्यासाठीं चौरंग करून त्यावर माझ्या सद्‌गुरूचीं पावलें बसवितों. ऐक्यभावाच्या ओंजळींत सर्वेंद्रियांच्या कळ्या भरून घेऊन मी त्यांचें गुरुचरणीं अर्घ्य देतों. अनन्यभावाच्या पाण्यानें सर्व वासना धुऊन स्वच्छ केलेल्या बोटानें मी गुरुपादुकांस चंदन लावतों. आत्मज्ञानाचे सोन्याचे अलंकार मी त्यांच्या चरणांवर चढवितों व शुद्ध आनंदाचें अष्टदलकमळ वाहतों. मी अहंकाराचा धूप जाळतों, नाहंभावानें ओवाळतों व समरसभावानें गुरुचरण निरंतर आलिंगितों." ( ज्ञा., १५, १–७. )

## निवृत्तिनाथ म्हणजे चित्सूर्यच होय.

आपल्या गुरूबद्दल ज्ञानेश्वरांना इतका निरतिशय आदर वाटतो कीं, निवृत्तिनाथांची कितीहि स्तुति केली तरी त्यांच्या खऱ्या मोठेपणाचें यथार्थ वर्णन करण्यास शब्द अपुरे पडतात असें त्यांना वाटतें. " एखाद्या दरिद्री मनुष्यास अमृताचा सागर दिसला तर त्यास उचिताचा विसर पडून, तो मामुली भाजीपाला देऊन त्या सागराचें आदरातिथ्य करण्यास धांवतो. येथें भाजीचें महत्त्व नसून, ज्या भावनेनें तो ती अर्पण करितो, तिचें महत्त्व फार आहे. त्याप्रमाणेंच दिव्यतेजसागररूपी ईश्वरास तो काडवातींची आरती ओवाळतो, तेव्हां त्यामागें असलेल्या त्याच्या भक्तीचें महत्त्व जास्त आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. मूल आईशीं नानाप्रकारें खेळतें. या खेळांच्या मुळाशीं असलेलें प्रेम आई जाणते,

म्हणूनच तिला त्या खेळांमुळें फार संतोष वाटतो. एकादा लहानसा ओहोळ गंगेस मिळाला, तर तो केवळ ओहोळ आहे म्हणून त्याचा अव्हेर गंगा करील काय ? हे निवृत्तिनाथा ! अशाच भावनेनें मी तुमची स्तुति शब्दांनीं करावी म्हणून पुढें सरसावलों आहें व ती अपुरी पडली तर तो एक पोरकट निष्पाप प्रयत्न आहे असें समजून तुम्ही क्षमा करा ! " (ज्ञा., १६, १७–३०.)

### ज्ञानेश्वरांची नम्रता

आपण लिहिलेला ग्रंथ जगांतील सर्वोत्तम ग्रंथांपैकीं एक ठरणार याची ज्ञानेश्वरांना पूर्ण जाणीव आहे. तथापि त्याच्या कर्तृत्वाचा अभिमान किंवा त्याचें श्रेय ते आपल्याकडे कधींच घेत नाहींत. " आपण चातक पक्षी असून चोंच वर करून तोंड उघडलें असतां निवृत्तिकृपामेघाचे कांहीं थेंब आपल्या तोंडांत पडले " असें ज्ञानेश्वरांनीं म्हटल्याचें मागें सांगितलेंच आहे. ज्ञानेश्वर म्हणतात कीं, " दैव अनुकूल असलें तर वाळूचींहि रत्नें होतात; देवाच्या मनांत आलें तर अधणांत टाकलेल्या खड्यांचाहि अमृताप्रमाणें गोड भात होतो. श्रीगुरूंनीं अंगीकार केला, तर सर्व संसारच मोक्षमय होतो. याप्रमाणेंच श्रीनिवृत्तिनाथांच्या कृपेनें माझ्या अज्ञानासच ज्ञानाच्या योग्यतेस आणून ठेवलें आहे. " (ज्ञा., १५, १८–२८.) आपल्या ग्रंथरचनेस निवृत्तिगुरुकृपेप्रमाणेंच इतरसंतकृपाहि कारणीभूत आहे याची पूर्ण जाणीव ज्ञानेश्वरांना आहे. " अहो, आपणच पोपटाला पढविलेले शब्द तो वेळेवर बोलणार नाहीं काय ? अहो, तुम्हीं संतांनींच लावलेलें हें सारस्वताचें गोड झाड तुम्हींच अवधानामृत शिंपून मोठें केलें पाहिजे, म्हणजे तें रसभावानें फुलेल व नानार्थ फळभारानें फळाला येईल व तुमच्या कृपेनें जगास सुखाचें स्थान होईल. रामाच्या दैवी शक्तीनें प्रेरित झाल्यावर रानांतील पाला खाणाऱ्या माकडांनीं लंकेश्वराचा नाश केला नाहीं काय ? श्रीकृष्णाच्या सामर्थ्यामुळें एकट्या अर्जुनानें अकरा अक्षौहिणी सैन्याचा फडशा पाडला नाहीं काय ? " (ज्ञा., ११, १७–२३.) 'महामुनि व्यास ज्या मार्गानें गेले त्याच मार्गाचा अवलंब करून केवळ त्यांचेच अर्थपूर्ण शब्द मी मराठी भाषेंत सांगत आहें', असें ज्ञानेश्वर म्हणतात. " श्रीव्यासांच्या कुसुममालेनें जर ईश्वर संतुष्ट

झाला तर माझ्या दूर्वांकुरांचा तो अव्हेर करील काय ? मोठमोठे हत्तींचे कळप पाणी पिण्यास क्षीरसिंधूच्या तटाकीं येतात म्हणून तेथें यःकश्चित् मुरकुटास मज्जाव होईल काय ? राजहंसाचें चालणें सुंदर असलें, म्हणून त्यामुळें जगांतील इतर प्राण्यांना चालण्यास प्रतिबंध आहे काय ? महासागरांत आकाश प्रतिबिंबित होतें, म्हणून तें डबक्यांत प्रतिबिंबित होण्यास कांहीं हरकत आहे काय ? त्याप्रमाणेंच मी भाष्यकारांना वाट पुसत, व्यासांचा मागोवा घेत, हा मार्ग आक्रमणार आहें. शिवाय, ज्यांचें सामर्थ्य सर्व चराचर पृथ्वी व्यापून राहिलें आहे, अशा निवृत्तिनाथांचा शिष्य मी नाहीं काय ? त्यांच्या शक्तीमुळेंच चंद्र आपल्या अमृतमय तेजानें जग निववीत नाहीं काय ? सूर्याच्या तेजांत त्याचें सामर्थ्य भरून राहिलेलें नाहीं काय ? ते निवृत्तिनाथ माझ्या अंतःकरणांत शिरून भरून राहिले आहेत, तेव्हां माझ्या प्रत्येक नव्या उच्छ्वासागणिक काव्य निर्माण होईल. गुरुकृपेनें काय साध्य होणार नाहीं ? " (ज्ञा., १८, १७०८–३५.) आपण गुरूंच्या हातांतलें केवळ एक बाहुलें असून खरें ग्रंथकर्तृत्व त्यांच्याकडेच आहे असें ज्ञानेश्वरांचें ठाम मत आहे.

# २ तत्त्वज्ञान

## प्रकृति आणि पुरुष

ज्ञानेश्वरी हा विवेचनात्मक ग्रंथ असल्यामुळें मूळ भगवद्‌गीतेंत जें तत्त्व-ज्ञान प्रतिपादिलें आहे त्याचाच अनुवाद येथें केला आहे. आतां प्रकृति व पुरुष यांचा संबंध हा भगवद्गीतेंतील तत्त्वज्ञानाचा अत्यंत महत्त्वाचा विषय असल्या-मुळें, ज्ञानेश्वरीच्या तत्त्वज्ञानाचाहि आधारभूत विषय तोच आहे. ज्ञानेश्वरींत प्रकृति–पुरुषांचें वर्णन अनेक वेळां आलें आहे. पुरुष हा अनादि साक्षी असून प्रकृति ही एकजिनसी कार्यकर्त्री आहे, असें नवव्या अध्यायांत ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे : ‘ राजानें नगर वसविलें म्हणतात, त्यामुळें राजाचे हात काय दमले ? जसें राजाच्या अध्यक्षतेखालीं सर्व प्रजा आपआपला व्यवहार करते, त्या-प्रमाणें प्रकृतीशीं माझा संबंध केवळ नाममात्र आहे; एरव्हीं सर्व करणें तिचें आहे. क्षितिजावर पूर्ण चंद्रोदय झाला कीं, समुद्रास अपार भरती येते; परंतु त्यामुळें चंद्रास कांहीं श्रम पडतात काय ? केवळ लोहचुंबकाच्या सान्निध्यामुळें लोहाचें आकर्षण होतें, म्हणून लोहचुंबकास कांहीं शीण होत नाहीं. घरांत ठेवलेला दिवा ज्याप्रमाणें कर्माचें किंवा अकर्माचें कारण होत नाहीं, त्याप्रमाणें मी अनादि साक्षी असून हीं सर्व भूतें आपआपले व्यवहार करतात.’ (ज्ञा., ९, ११०–२९.) तेराव्या अध्यायांत पुनः प्रकृति–पुरुष–संबंधाचा प्रश्न उपस्थित होतो व त्याचें विवरण अनेक उपमा देऊन ज्ञानेश्वरांनीं फार उत्तम प्रकारें केलें आहे. देहास चेतविणाऱ्या ‘पुरुषा’सच ‘चेतना’ ही संज्ञा आहे. ही चेतना शरीरांत नखशिखांत उभी व जागी असते : व वसंतामुळें वनराजी फुलते, त्याप्रमाणें या चेतनेमुळें मन, बुद्धि इत्यादि शक्ती टवटवीत होतात व फुलतात. राजाला आपल्या सैन्याची मुळींच

माहिती नसते; परंतु त्याच्या नुसत्या आज्ञेनें परचक्राचा पराभव होतो. सूर्य नुसता उगवला कीं, लोक आपआपल्या कामास लागतात; नुसत्या पाहण्यानें कांसवी आपल्या पिलांचें पोषण करते; त्याचप्रमाणें जड शरीरांत असलेल्या आत्म्याच्या नुसत्या अस्तित्वानें या अचेतन शरीराचें चलनवलन घडतें. (ज्ञा., १३, १३४–४१.) तेराव्या अध्यायांत दिलेलें प्रकृति–पुरुषांचें वर्णन फारच बहारीचें आहे : "प्रकृति व पुरुष हीं दोन अनादिसिद्ध जुळीं तत्त्वें होत. पुरुष हा 'अस्तित्व'वाचक, तर प्रकृति ही 'क्रिया'वाचक आहे. प्रकृतीच्या पाप-पुण्यात्मक कर्मांमुळें उद्भवणाऱ्या सुखदुःखांचा उपभोग पुरुष घेतो. या प्रकृति-पुरुषांचा संयोग खरोखरच अवर्णनीय आहे. येथें स्त्री मिळविते व पुरुष कांहीं न करितां खातो. या स्त्री–पुरुषांचा संग कधींच घडत नाहीं; तरी यांच्यामुळें विश्व निर्माण होतें. प्रकृति अ–देही आहे, तर पुरुष निराकार, पांगळा व म्हाताऱ्याहून म्हातारा आहे. प्रकृति साकार व सगुण असून, हरघडी नवें नवें रूप धारण करते व जडास सुद्धां माजविते. ती नादांची टांकसाळ व सर्व चमत्कारांचें माहेरघर आहे. उत्पत्ति व लय तिच्यापासून होतात. ती अद्भुत मोह पाडणारी शक्ति आहे. ती स्वयंभूची संभूति, अमूर्ताची मूर्ति, निर्गुणाचे गुण, अचक्षूचे चक्षू, अश्रवणाचे श्रवण, अचरणाचे चरण आहे. अवसेस चंद्राचें तेज हरपावें, तसें या पुरुषाचें सर्व पुरुषत्व प्रकृतीमध्यें लोपून जातें. गाईच्या स्तनांत दूध किंवा लांकडांत अग्नि किंवा गुंडाळलेल्या फडक्यांत रत्नदीप असतो, त्याप्रमाणें प्रकृति पुरुषांत असते. पराधीन राजाप्रमाणें, रोगग्रस्त सिंहाप्रमाणें किंवा बळेंच निजवून स्वप्नाचा सोस साहण्यास लावलेल्या इसमाप्रमाणें प्रकृति पुढें येतांच पुरुषाचें सर्व तेज लोपतें. आरसा जवळ असला तरच मुखाचें प्रतिबिंब दिसतें; कुंकवा-मुळेंच स्फटिक तांबडें दिसतें; त्याप्रमाणें प्रकृतीमुळेंच हा अजन्मा जन्मास येतो असें वाटतें. जुईच्या वेलीस आधारभूत असलेल्या निःस्तब्ध खांबाप्रमाणें हा प्रकृतींत उभा असतो. प्रकृतिनदीच्या तीरावर हा मेरूप्रमाणें उभा राहतो. त्या नदींत त्याचें प्रतिबिंब पडतें, परंतु तिच्या लाटेनें तो हलत नाहीं. प्रकृति होते व जाते; परंतु तो आहे तसाच कायम राहतो. म्हणून तो विश्वाचा अनादि शास्ता आहे." (ज्ञा., १३, ९५८–१०३६.) सांख्य जिला अव्यक्त म्हणतात,

किंवा वेदान्ती जिला माया म्हणतात, ती प्रकृतीच होय. अज्ञान किंवा आत्म्याची विस्मृति हें तिचें स्वरूप होय. "वस्तुतः प्रकृति ही माझी गृहिणी आहे. ती अनादि, तरुण व अनिर्वाच्य गुणांची आहे. नसणें हें तिचें रूप. निद्रितांना ती जवळ आहे व जागृतांना दूर आहे. मी निजतों तेव्हां ती जागते व केवळ माझ्या अस्तित्वाच्या संभोगानें ती गर्भिणी होते. ती जें मूल प्रसवते त्यापासून हे तीनहि लोक निर्माण होतात. ब्रह्मा, विष्णु व शंकर म्हणजे या बालकाचे सकाळ, दुपार व संध्याकाळ होत. महाप्रलय होईपर्यंत हें मूल खेळतें व नंतर निवांतपणें निजतें तें पुनः कल्पोदयाच्या वेळीं जागें होतें." ( ज्ञा., १४, ६८–११७. )

## क्षर, अक्षर व उत्तम पुरुष

क्षराक्षर व परमात्म्यासंबंधींचीहि चर्चा ज्ञानेश्वरांनीं भगवद्गीतेंतूनच घेतली आहे. या प्रश्नांचें भगवद्गीतेंतील विवरण स्पष्ट नाहीं. जें बदलतें तें क्षर, जें अव्यय आहे तें अक्षर व या दोहोंच्याहि पलीकडे असलेलें तत्त्व म्हणजे परमात्मन् होय. अक्षर व परमात्मन् यांत भेद कोणता हें समजणें जरा कठिण आहे. तथापि मूळ भगवद्गीतेचें पूर्ण अनुकरण करून ज्ञानेश्वरांनींहि हा भेद प्रतिपादला आहे व जर्मन तत्त्ववेत्ता हेगल् याच्या विवेचन–पद्धतीप्रमाणें त्यांनीं क्षर व अक्षर यांचा समन्वय परमात्म्यांत केला आहे : "सर्व आकाशांत ज्या-प्रमाणें दिवस व रात्र दोनच नांदतात, त्याप्रमाणें या अवघ्या संसार-राजधानींत क्षराक्षर या दोन तत्त्वांचीच वस्ती आहे. येथें आणखी एक तिसरा पुरुष आहे; परंतु त्यास या दोघांचें नांवहि सहन होत नाहीं व तो या दोघांसहि गिळून टाकतो. एक वेडा, अंधळा व पंगू आहे, तर दुसरा सर्वांगपूर्ण व चांगला आहे. एकाच गांवांत राहावयास आल्यामुळें या दोघांचा संबंध येतो." ( ज्ञा., १५, ४७१–७७. ) यांपैकीं जड पदार्थ व शरीरांत कोंडून राहिलेला जीवात्मा म्हणजे क्षर होय. लहान–थोर, स्थावर–जंगम, किंवा जें मन–बुद्धींना कळतें त्या सर्वांचा क्षरामध्यें समावेश होतो. जेवढें म्हणून पंचमहाभूतांपासून उत्पन्न होतें, जें नामरूपांनीं दृग्गोचर होतें, जें त्रिगुणांच्या टांकसाळींत सांपडतें, ज्यास अष्टविधा प्रकृति म्हणून आम्ही ओळखतों, ज्याचे क्षेत्रद्वारा छत्तीस भाग केलेले आपण

पाहिले, अश्वत्थवृक्षरूपानें ज्याचें आम्हीं नुकतेंच वर्णन केलें, जें, सिंहानें विहिरींत आपलेंच प्रतिबिंब पाहून रागावून त्यावर संभ्रमानें उडी मारावी त्याप्रमाणें, स्वतः-च्याच प्रतिबिंबासारखें भासतें, जें साकार नगर कल्पून आपल्या स्वतःच्या स्वरूपाचा विसर पडल्यामुळें तेथेंच निद्रित होतें व 'हा माझा जनक, ही माझी माता, मी गोरा किंवा कुरूप आहें, पुत्र, वित्त, कान्ता, हीं सर्व माझीं आहेत ' अशा भ्रमांत जो सांपडतो, खळाळीच्या पाण्यावर हलत नसतांहि जो हलणाऱ्या चंद्रासारखा दिसतो व जो उपाधीमुळें क्षणजीवी असतो त्या सर्वांस क्षर पुरुष म्हणावें." ( ज्ञा., १५, ४७८–५०१. ) "सर्व पर्वतांमध्यें जसा मेरू, तसें दिसणारें तें अक्षर होय; महासागर आटल्यावर जसें पाणी किंवा तरंग राहत नाहींत, त्याप्रमाणें तें सर्वस्वीं निराकार आहे. जेव्हां हें सर्व विश्व मावळतें व आत्मबोधाचा प्रकाश पडत नाहीं, तेव्हांच्या केवळ अज्ञानास अक्षर म्हणतात; अवसेच्या दिवशीं प्रकाशाचा एकहि किरण नसतां चंद्राची स्थिति होते तसें अक्षर जाणावें; मानसशास्त्रदृष्ट्या तें सुषुप्तीसारखें आहे. तर याच्या उलट जागृति व स्वप्न या दोनहि अवस्थांत क्षर प्रतीत होतें; अक्षर हें अधःशाखसंसारवृक्षाचें मूळ आहे; जें बदलत नाहीं व जें नाश पावत नाहीं व म्हणून जें सर्वांत थोर आहे तें अक्षर होय." ( ज्ञा., १५, ५०२–३४. ) "अज्ञान ज्ञानांत विरतें व स्वतःचा नाश करतें, अग्नि काष्ठ जाळून स्वतःहि जळून जातो; त्याप्रमाणें ज्ञानानें आपलाच नाश केल्यावर जो मागें राहतो, तो उत्तम पुरुष होय. तो क्षराक्षरांच्या विरुद्ध व त्या दोहोंच्याहि पलीकडे आहे. तो ज्ञेयविरहित ज्ञानासारखा दिसतो. मानसशास्त्रदृष्ट्या तो जागृति, स्वप्न, सुषुप्ति यांपेक्षां श्रेष्ठ आहे; प्रलयकाळीं नदनद्यांना एकत्र करणाऱ्या महार्णवाच्या पुराप्रमाणें तो आपली सर्व मर्यादा ओलांडतो. नाक व फूल या दोहोंमध्यें असणाऱ्या वासाप्रमाणें तो आहे व तो वास दिसत नसला तरी 'तो नाहीं' असें म्हणतां येत नाहीं. द्रष्टा व दृश्य या दोहोंच्या पलीकडे असलेलें केवळ सत्तत्त्व तो आहे. तो प्रकाश्य वस्तु नसतां प्रकाश व सत्तेचा विषय नसतां सत्ताधीश आहे. तो नादांचा नाद, स्वादांचा स्वाद, आनंदांचा आनंद, प्रकाशांचा प्रकाश व शून्यांचें महाशून्य आहे. तो दिवस किंवा रात्र या दोनहि रूपांनीं न भासणारा सूर्य आहे व त्यालाच परमात्मा हें नांव आहे." ( ज्ञा., १५, ५२६–५६. )

## देह व आत्मा

क्षराक्षर व प्रकृति–पुरुष हे अंतिम सत्यासंबंधींचे विचार क्षणभर आपल्या मनांतून काढून टाकले व त्यांसंबंधीं मानसशास्त्रदृष्टया विचार करूं लागलों, तर शरीर व आत्मा यांचा अन्योन्यसंबंध काय हाच प्रश्न येथें महत्त्वाचा ठरतो. याविषयीं ज्ञानेश्वरांचें काय मत आहे हें आपण पाहूं : शरीर म्हणजे पंचमहाभूतांचा केवळ संयोग होय. रथांगांच्या मेळाव्यास रथ म्हणतात; चतुरंग सैन्यांचा समूह म्हणजेच सैन्य; किंवा अक्षरांचा व शब्दांचा समूह म्हणजेच वाक्यें; तेल, वात व अग्नि यांचें एकत्र जमणें म्हणजेच दीप; त्याप्रमाणें छत्तीस तत्त्वांचा मेळावा म्हणजेच देह होय." (ज्ञा., १३, १५१–५६.) देह व आत्मा यांमध्यें पूर्वपश्चिमेइतका फरक आहे. सरोवरीं सूर्य प्रतिबिंबित व्हावा, त्याप्रमाणें आत्मा देहांत प्रतिबिंबित झाला आहे. तो देह–कर्माच्या गुणांत गुंतला आहे व जन्ममृत्यूंच्या चक्रांत सांपडून भ्रमत राहिला आहे. देह म्हणजे एक लोण्याचा गोळा असून, तो काळानळाच्या अग्निकुंडांत टाकला आहे व त्याचें जीवित माशी पंख हलविते न हलविते तोंच नाहींसें होतें, इतकें क्षणभंगुर तें आहे. हें शरीर चुकून आगींत पडलें तर त्याचें तात्काळ भस्म होतें. तें कोल्ह्यांकुत्र्यांच्या स्वाधीन झालें तर त्याची विष्ठा होते. हे दोनहि प्रकार चुकले, तर तें कीटकांचा पुंज बनतें. एकंदरींत परिणाम वाईटच ! याउलट, आत्मा शुद्ध, नित्य, सहज व अनादि आहे. तो अखंड, सर्वव्यापी व अक्रिय आहे. तो कृश नाहीं व स्थूलहि नाहीं. तो साभास वा निराभासहि नाहीं. तो प्रकाश वा अप्रकाशहि नाहीं. तो भरित वा रिक्तामाहि नाहीं. तो शून्यपणामुळें मूर्त वा अमूर्तहि नाहीं. तो आनंद वा निरानंदहि नाहीं. तो एक वा अनेकहि नाहीं. आत्मपणामुळें तो मुक्त अगर बद्धहि नाहीं. आकाशांत दिवसामागें रात्र व रात्रीनंतर दिवस येत जात राहतात, त्याप्रमाणें आत्मसत्तेमुळें देहामागें देह निर्माण होत राहतात." (ज्ञा., १३, १०९५–११२४.)

## पुनर्जन्मवाद

सत्त्व, रज व तम हे मनाचे मुख्य गुण होत, असें मानसशास्त्रानें सिद्ध झालें आहे. या तीन गुणांच्या आधारावरच ज्ञानेश्वरांनीं आपला पुनर्जन्मवाद

प्रतिपादिला आहे. ते म्हणतात कीं, "सत्त्वगुणांचा विकास ज्याच्या अंतःकरणांत झाला आहे, त्यास त्याच्या मरणानंतर रजोगुणीं किंवा तमोगुणी मनुष्यापेक्षां निराळी गति मिळते. अंतःकरणांत सत्त्वगुणांचा विकास झाला म्हणजे वसंतऋतूंत कमलांत सुवास न मावल्यामुळें तो जसा बाहेर पडतो, त्याप्रमाणें प्रज्ञा शरीरांत समावत नाहीं व ती बाहेर पडून वाहूं लागते. त्याच्या सर्व इंद्रियांच्या अंगणांत विवेक पाहरा करूं लागतो व त्याचे हातपाय देखील डोळे बनतात. राजहंसाची चोंच पाणी व दूध निरनिराळें करते त्याप्रमाणें त्याचीं इंद्रियेंच दोषादोषविवेक पारखतात. जें ऐकूं नये तें कानच नाकारतात. जें पाहूं नये तें दृष्टि आपण होऊन पाहत नाहीं. जें बोलूं नये तें जीभ आपणच टाळते. दिव्यापुढें अंधार आपोआप पळूं लागतो, त्याप्रमाणें निषिद्ध असेल तें त्याच्या इंद्रियांसमोर येतच नाहीं. पावसाळ्यांत महानदीस पूर आला असतां तिचें पाणी चोहोंकडे पसरतें, त्याप्रमाणें त्याची बुद्धि फांकते व त्यास सर्व शास्त्रांचें ज्ञान होतं. पौर्णिमेच्या दिवशीं चंद्रप्रभा आकाशांत धांवते, त्याप्रमाणें त्याची वृत्ति ज्ञानांत फांकते व त्याच्या सर्व वासना त्याच्यांतच एकवटतात. त्याचीं कर्मे नाहींशीं होतात. त्याच्या मनास विषयाचा वीट येतो. अशा वेळीं त्यास मरण आलें तर त्याचा नवा जन्म पूर्वीप्रमाणेंच सत्त्वगुणपूर्ण होतो व केवळ ज्ञान्यांच्याच कुलांत तो जन्म घेतो. राजा डोंगरावर गेला तरी त्याचें राजेपण कमी होतें काय? किंवा येथींचा दिवा शेजारच्या गांवाला नेला तरी तो दिवाच राहतो ना?" (ज्ञा, १४, २०५–२२.) राजस गुणांची वाढ झाली तर काय होतें? "वावटळ उठली म्हणजे ती चोहोंकडे पसरते, त्याप्रमाणें तो आपल्या इंद्रियांना मोकळीक देतो व आपल्याच कामाची धुमाळ माजवितो. त्यास परदारादि कल्पना नीतीविरुद्ध वाटत नाहींत. शेळीच्या जिभेस 'सेव्यासेव्य' भेद राहत नाहीं, त्याप्रमाणें तो विषयभोगांत आपलीं इंद्रियें मोकाट सोडून देतो व पात्रापात्रतेचा विचार न करतां हातीं येईल तें अफाट काम करण्यास मागें घेत नाहीं. भव्य राजवाडा बांधणें, मोठा अश्वमेध यज्ञ करणें, नवीन गांवें वसविणें, नवीन तलाव खोदणें व अरण्यें वाढविणें इत्यादि अचाट कल्पनांच्या माग तो लागतो. आपल्या वासनांच्या पूर्ण आहारीं जाऊन तो सर्व विश्व पादाक्रांत

करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगतो. अशा रजोगुणांचा विकास होत असतां त्यास मृत्यु आला, तर तो पुनः निश्चितपणें मनुष्ययोनींत जन्म घेतो. भिकारी राजवाड्यांत राहिला तर तो राजा होईल काय? राजाच्या लग्नांत बैल जरी वऱ्हाडी म्हणून गेला तरी त्याचा कडबा चुकेल काय? अशा मनुष्याच्या व्यापाराला अंतच नसतो व तो नेहमीं बैलाप्रमाणें आपल्या कार्यास जुंपलेला असतो."(ज्ञा., १४,२२७–४३.) यापुढें तमोगुणांची वाढ झाली तर काय परिणाम होतात याचें वर्णन दिलें आहे: "अमावास्येच्या रात्रीप्रमाणें त्याचें मन अज्ञान-अंधारानें भरून जातें व तें स्फूर्तिहीन व शून्य होतें. त्याच्या मनांत विचारास जागाच राहत नाहीं. त्याची स्मृति कायमची नष्ट होते. शरीरांत अविवेक सबाह्य अंतरीं भरून राहतो व त्याच्या अंतःकरणांत मूर्खपणाचें साम्राज्य बोकाळतें. घुबड रात्रींच पाहतें त्याप्रमाणें तो पापकृत्येंच तेवढीं करतो; तो निषिद्ध कर्मेंच कवटाळतो. दारू न पितां तो धुंद होतो, संनिपात न होतां बरळतो व प्रेमाशिवायच वेड्याप्रमाणें बेहोष होतो. त्याचें चित्त जरी त्यास सोडून गेलें असलें, तरी तो उन्मनी अवस्थेंत नसतो. अशा स्थितींत त्यास मरण आलें, तर फिरफिरून त्यास तामसी लोकांत जन्म घ्यावा लागतो. दीप-कलिकेमुळें पेटविलेली आग भडको वा विझो, ती मूळस्थितींतच राहते, त्याप्रमाणें तमोवृत्तीची वाढ झाली असतां तो पशु, पक्षी, झाड किंवा कृमि यांचा जन्म घेतो." (ज्ञा., १४, २४४–२६०.)

## मृत्यूनंतर जीवाची परमात्म्याशीं भिन्नाभिन्नता

या पुनर्जन्माच्या उलट मुक्ति किंवा ब्रह्मनिर्वाणाची स्थिति असते. सत्त्व, रज व तम या गुणांच्या पलीकडे गेलेल्या कांहीं थोड्या भाग्यवान् जीवांना ही स्थिति प्राप्त होते. याच जन्मीं ते आपल्या भक्तीमुळें देवाशीं एकरूप झालेले असतात. असे जीव एकदां ईश्वरांत लीन झाले म्हणजे, सागरास मिळालेल्या प्रवाहांप्रमाणें ते कधींच माघारे येत नाहींत. मिठाची बाहुली एखाद्या भांड्यांतील पाण्यांत टाकली असतां ती त्या पाण्यांत विरून जाते व परत येत नाहीं, त्याप्रमाणें आपल्या श्रेष्ठ ज्ञानानें परमेश्वराशीं समरस झालेले जीव

हा देह टाकल्यावर पुनः परत येत नाहींत. येथें जिज्ञासु अर्जुनानें श्रीकृष्णास असा प्रश्न केला कीं, " हे जीव देवाशीं एकरूप होतात कीं भिन्नत्वानें राहतात? ते देवाशीं तल्लीन झाल्यावर परत येत नाहींत हें खरें, परंतु मग त्यांचें व्यक्तिमत्त्व कायम राहतें किंवा नाहीं? ते अनादिसिद्ध भिन्नच राहत असतील, तर ते परत येत नाहींत असें म्हणणें असंबद्ध होईल. कारण, फुलांत षट्पदें लीन झालीं म्हणून कांहीं तीं फुलेंच होत नाहींत; बाण लक्ष्याहून भिन्न असतात व लक्ष्य भेदल्यावरहि बाणरूपानेंच परत येतात; त्याप्रमाणें हे जीव शेवटच्या आवरणांतूनहि पूर्वरूपानेंच परत येतात काय? उलट जीव व ईश्वर अभिन्न असले, तर जीव ईश्वरांत लीन होतात या म्हणण्याचा अर्थ काय? कारण हे जीव ईश्वराशीं मूलतःच एकरूप आहेत. शस्त्रानें आपणच आपणास कसें खुपावें? याप्रमाणें तुझ्याशीं अभिन्न असलेले हे जीव तुझ्या रूपांत विरून जातात किंवा तुझ्यापासून परत येतात, असें कसें म्हणावें?" या अर्जुनाच्या आक्षेपास भगवान् श्रीकृष्णांनीं उत्तर दिलें कीं, "मला मिळून परत येण्याचे व न येण्याचे मार्ग परस्परभिन्न आहेत. सूक्ष्म ज्ञानदृष्टीनें पाहिलें तर ईश्वर व जीव सहजच एकरूप आहेत. तेंच वरवर बाह्यतः पाहिलें तर ते भिन्न आहेत असें वाटतें." श्रीकृष्ण येथें भौतिक व पारमार्थिक दृष्टींतील फरक स्पष्टपणें मांडीत आहेत असें वाटतें. समुद्रावरील लाटा समुद्राहून भिन्न दिसतात; तथापि त्या समुद्राशीं एकरूपहि असतात. सुवर्णाचे अलंकार सुवर्णाहून भिन्न दिसत असले तरी ते सुवर्णरूपच असतात. म्हणून ज्ञानदृष्टीनें पाहिलें असतां हे जीव ईश्वराशीं अभिन्न व एकरूपींचें आहेत, तरी अज्ञानामुळें ते भिन्न भासतात. (ज्ञा., १५, ३१७–३४.) हें मत सत्य आहे असें गृहीत धरलें, तर पुनर्जन्म खोटा आहे असें मानणें म्हणजे यापुढची एकच पायरी होय व श्रीज्ञानेश्वरांनीं एका ठिकाणीं हें मत स्पष्टपणें व निर्भयपणें मांडलें आहे. त्याप्रमाणें, 'आत्मा देह सोडून जातो, तेव्हां सर्व इंद्रियांचा समुदाय आपल्याबरोबर नेतो' हें मानवी जीवांचें म्हणणें म्हणजे मूर्खपणा होय. मावळता सूर्य लोकांची दृष्टि आपल्या किरणांबरोबर घेऊन जातो किंवा वायु सुगंध वाहून नेतो, ही केवळ अविवेकाची दृष्टि होय. आत्मा देहांत येतो, विषय भोगतो अथवा देहांतून जातो, असें म्हणणें हें केवळ अज्ञान होय.

मनुष्यास आपलें प्रतिबिंब आरशांत पाहतां येतें, म्हणून काय आरशांत प्रतिबिंब पाहण्यापूर्वी तो जगांत नव्हता असें सिद्ध होतें ? किंवा आरसा नेला कीं प्रतिबिंब नाहींसें होतें, म्हणून काय तो मनुष्यहि नाहींसा होतो ? याप्रमाणें आत्मा हा सदैव आत्माच राहतो व देह नेहमीं देहच राहतो, ही गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे. ज्यांच्या विवेकाचा विकास झाला आहे व स्फूर्ति स्वरूपीं स्थिर झाली आहे असे ज्ञानी आत्म्यास या प्रकारें पाहतात. तारागणांनीं भरलेलें गगन महासागरांत प्रतिबिंबित झालें, तर तें खरोखरच वरून तुटून जसेंच्या तसें खालीं पडलें आहे असें न समजतां विवेकदृष्टीनें तें आकाशाचें केवळ प्रतिबिंब आहे असेंच मानावें लागेल. डबकें भरतें व वाळून जातें, परंतु सूर्य आहे तसाच राहतो; त्याप्रमाणें देह येतो व जातो, परंतु आत्मा आत्मरूपच राहतो. तो वाढत नाहीं किंवा कमी होत नाहीं. तो कर्माकर्माचा कर्ता होत नाहीं, हें आत्मज्ञान्यांना स्पष्ट समजतें. ( ज्ञा., १५, ३६१–९०. )

## अश्वत्थवृक्षाचें वर्णन

प्रकृति–पुरुष व क्षराक्षर यांप्रमाणेंच अश्वत्थाचेंहि महत्त्व भगवद्गीतेप्रमाणेंच ज्ञानेश्वरीमध्येंहि फार मोठें आहे. ज्ञानेश्वरांनीं या संसाररूपी अश्वत्थवृक्षाचें वर्णन फार बहारीनें व विस्तारानें केलें आहे, म्हणून त्याचा विचार जरा विस्तारानें येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं. हा संसारवृक्ष किती असत्य आहे हें वाचकांस पटावें व त्याबद्दल त्यांना वैराग्य उत्पन्न व्हावें, हाच अश्वत्थवर्णनाचा हेतु होय, असें ज्ञानेश्वर म्हणतात. हा वृक्ष इतर वृक्षांहून अगदीं भिन्न आहे. इतर सर्व वृक्षांचीं मुळें खालीं जमिनींत व त्यांच्या शाखा वर वाढत जातात. याउलट हा वृक्ष खालीं वाढत जातो हें आश्चर्य होय. कल्पांतींच्या पाण्यानें सर्व आकाश व्यापा त्याप्रमाणें जें आहे व नाहीं तें सर्व या वृक्षानें व्यापिलें आहे. त्याला फूल नाहीं व त्याचा वास घेणाराहि कोणी नाहीं. त्याला फळ नाहीं किंवा तें चाखणाराहि कोणी नाहीं. त्याचीं मुळें वर जात असलीं, तरी त्याचें उन्मूलन करतां येत नाहीं. ( ज्ञा., १५, ४६–६५. ) याचें ऊर्ध्वमूल म्हणजे काय व हा वृक्ष कसा अंकुरतो हें ज्ञानेश्वरांनीं पुढें स्पष्ट करून सांगितलें आहे. निरुपाधिक वस्तूच या

वृक्षाचें उर्ध्वमूल होय. तो कानास एकूं न येणारा आवाज, घ्राणाला अग्राह्य असा वास व सुरतेंविण आनंद आहे. त्याच्या अलीकडे तेंच पलीकडे व मागें तेंच पुढेंहि आहे. तें स्वतः अदृश्य असून, कांहीं दृश्य नसतां पाहतें. तें ज्ञातृ–ज्ञेय–विहीन नुसतें ज्ञान आहे. तें कारणहि नाहीं व कार्यहि नाहीं. तें दुजें नाहीं, एकहि नाहीं. तें केवळ आत्मरूपानें आपणच असतें. ( ज्ञा., १५, ७२–७९.)

## मूळ कसें अंकुरतें ?

ज्या शक्तीनें हें मूळ अंकुर धरतें त्या शक्तीस ज्ञानेश्वरांनीं माया असें म्हटलें आहे. ही माया वस्तूपासून उद्भवते माया म्हणजे 'असत्' या शब्दाचा समानार्थक एक प्रतिशब्द होय. ती वांझेच्या संततीप्रमाणें आहे. ती सत् नाहीं वा असत्हि नाहीं. तिला विचाराचें नांवहि सहन होत नाहीं. ती नाना तत्त्वांची पेटी आहे. ती जगद्भ्रमाचें आकाश आहे किंवा अनेक जातींचें घडी केलेलें वस्त्र आहे. ती संसारवृक्षाचें बीं, प्रपंचचित्राची भूमिका किंवा विपरीत ज्ञान करून देणारी दीपिकाच आहे. निद्रा आली असतां आपण आपल्यामध्यें मुग्ध होतों, तशी माया आहे. प्रज्वलित दिवा बंद करणाऱ्या काजळीप्रमाणें माया आहे. स्वप्नांत प्रिय मनुष्याच्या कल्पनेनेंच उभारलेली तरुणी त्यास खोटेंच जागें करून आलिंगन दिल्यावांचून आलिंगन देते व कामुक करते, तशी माया आहे. आपल्या खऱ्या स्वरूपाविषयीं अज्ञान म्हणजेच माया. स्वप्न व जागृति या दोहोंहून भिन्न अशी गाढ अज्ञानाची झोंप म्हणजेच माया होय. ( ज्ञा., १५, ८०–९०.)

## अश्वत्थ म्हणजे मूर्तिमंत असत् होय

ज्ञानेश्वरांच्या मतें अश्वत्थ म्हणजे मूर्तिमंत असत्य होय. न श्वः अपि तिष्ठति. उद्यां म्हणजे एक क्षण सुद्धां न टिकणारा म्हणून त्यास अश्वत्थ असें म्हणतात. ढग ज्याप्रमाणें क्षणांत अनेक रंग पालटतो किंवा वीज एक निमिष-भरहि स्थिर राहत नाहीं, हलत्या पद्मदळावरील पाणी त्यास जसें चिकटत

नाहीं किंवा व्याकुळ मन जसें सारखें बदलत राहतें, त्याप्रमाणें हा अश्वत्थ क्षणोक्षणीं बदलत राहतो. या क्षणत्वामुळेंच यास अश्वत्थ म्हणतात. तो अस्तित्वांत केव्हां येतो व नाहींसा केव्हां होतो हें लोकांस मुळींच समजत नाहीं. मन्वंतरामागून मन्वंतरें येतात किंवा एका बांबूपासून अनेक बांबूंचा विस्तार होतो किंवा उंसाच्या एका कांडींतून दुसरी कांडी निघते किंवा सालाबाद चालू सालाचें कारण असतें, प्रवाहांत वाहऱ्या पाण्याचे जागीं मागील पाणी येतें, त्याप्रमाणें हा अश्वत्थ वस्तुतः असत् असूनहि जग त्यास उगीचच सत् मानतें. डोळ्याची उघडझांप एकदां व्हावयाच्या आंत कोट्यवधी घडामोडी होतात. अज्ञानामुळें तरंग स्थिर वाटतो. कावळ्याचें एकच बुबुळ दोन्ही डोळ्यांच्या खांचांत फिरत राहिल्यामुळें त्यास दोन डोळे आहेत असा भ्रम होतो. किंवा वेगातिशयामुळें जमिनीवर फिरणारी भिंगरी तीस चिकटली आहे असें वाटतें. अंधारांत जळतें कोलीत वर्तुळाकार फिरविल्यामुळें तें आगीचें अखंड वर्तुळ आहे असा भास होतो. त्याप्रमाणें हा संसारवृक्ष सारखा होत–जात असला तरी लोक त्यास अव्यय मानतात ! परंतु पार्था, हा वृक्ष एका क्षणांत कोटि वेळां होतो व जातो. अज्ञान याचें मूळ असून याचें अस्तित्व खोटें व क्षणिक आहे, असें जो जाणतो तोच खरा सर्वज्ञ होय. ( ज्ञा., १५, ११०–१४१. ).

### अश्वत्थाचें उन्मूलन

"ज्याचें मूळ निराकारांत असून शाखा मात्र खालीं ब्रह्मांडभर पसरलेल्या आहेत असा हा भव्य व अफाट असद्रूपी अश्वत्थ वृक्ष कशानें तोडतां येईल व शेवटीं याचें उन्मूलन कशानें होईल ?" या प्रश्नाचें उत्तर अगदीं सोपें आहे. तो असत्यरूप आहे असें जाणणें म्हणजेच त्याचें उन्मूलन होय. बाळास बागुलबुवाची भीति दाखविली म्हणून तो खराच असतो काय ? गंधर्व–नगरींतील किल्ले कसे पाडावयाचे ? सशाचीं शिंगें कशीं मोडावयाचीं ? आकाशपुष्प फुलावें कसें व मग तें तोडावें कसें ? हा वृक्षच जर खोटा, तर त्यास तोडावयाचे सायास कसले ? वांझेचीं लेंकुरें घरभर व्हावीं तशांतलाच हा प्रकार आहे. जागा झालेल्यास स्वप्नांतल्या गोष्टी सांगण्यांत काय अर्थ ? मृगजळांत कोणीं साळी

पेरल्या आहेत काय ? हा वृक्षच मुळीं असत्यरूप आहे हें जाणणें म्हणजेच त्याचा नाश होय. ( ज्ञा., १५, २१०–२२३. )

## या अश्वत्थास आदि, अंत व स्थिति नाहींत

या वृक्षास आदि, मध्य व अंत आहेत असें लोक उगीचच म्हणतात. वस्तुतः तो कधीं उगवत नाहीं, वाढत नाहीं व त्याचा नाशहि होत नाहीं. वांझेच्या मुलाची जन्मपत्रिका तयार करतां येईल काय ? आकाशाच्या निळ्या रंगाबद्दल कांहीं निश्चित विधान करतां येईल काय ? ख–पुष्पें खरींच वेंचतां येतील काय ? या वृक्षास आदि नाहीं व अंतहि नाहीं व जें आहेसें भासतें तेंहि तितकेंच खोटें आहे. एकाद्या पर्वतांत उगम पावून समुद्राकडे वाहणाऱ्या नदी-सारखा हा वृक्ष नाहीं. तो मृगजळासारखा नुसता भासणारा आहे, खरा नाहीं. तो अनेकरंगी इंद्रधनुष्यासारखा आहे. त्यांतील रंग खरे नसून नुसते दिसतात. आत्मज्ञानानेंच या वृक्षाचें खंडन करतां येतें. याच्या नुसत्या शाखा तोडीत राहिल्यानें याचा नाश होत नाहीं. सम्यक्ज्ञानानेंच याला मुळासकट तोडलें पाहिजे. दोरीच्या सापास मारण्यासाठीं काठ्या गोळा करण्याची काय जरूरी ? तो नुसता शीण होय. स्वप्नांतील भयास जागृति हेंच औषध होय. या अज्ञान-मूलक वृक्षाचें खंडन ज्ञानखड्गानेंच केलें पाहिजे. ( ज्ञा., १५, २२४–५४. )

## भक्तिपूर्ण ईश्वरचिंतनानें मायासागर तरून जातां येईल

भक्तास मायासागर कसा तरून जातां येतो हें ज्ञानेश्वरांनीं पुढील अत्यंत सरस रूपमालिकेंत सांगितलें आहे : "परब्रह्मरूपी पर्वतांतून निघणारी ही माया-सरिता प्रथम महदादिकांचें रूप धारण करते. नंतर गुणरूपी मेघांच्या महावृष्टी-मुळें तिला पूर येऊन यमनियमादि मगर तिच्यांत वाहून जातात. या पुरांत द्वेषाचे भोंवरे व मत्सराचीं वळणें आहेत; त्यांत प्रमादरूपी मोठे मासे तरंगत राहतात. इंद्रियसुखाच्या बेटावर कामवासनांच्या लाटा आदळत राहतात व तेथें अनेक जीव एकत्र आलेले दिसतात. हा वेगवान् महापूर तरून जाण्यास कोणताच मार्ग दिसत नाहीं व यांतून पार पडणें अशक्य वाटतें. कारण, हा

तरून जाण्याचा जो जो उपाय करावा, तो तो अपायच ठरतो. केवळ आपल्या बुद्धीच्या सामर्थ्यानें हा पूर तरून जाण्याचा प्रयत्न ज्यांनीं केला, त्यांचा मागमूस सुद्धां राहिला नाहीं. कांहीं जण जाणिवेमुळें गर्वाच्या डोहांत बुडून मेले. वेद्त्रयीचे भोपळे बांधून जे निघाले, ते जणूं अहंभावाचे दगड गळ्यांत बांधल्यामुळें मदरूपी महामत्स्याच्या तोंडांत एकदम सगळेच गडप झाले! जें यज्ञक्रियेची पेटी पोटास बांधून निघाले, ते स्वर्गसुखाच्या खबदाडींत अडकून राहिले. तेथें वैराग्याची नाव जात नाहीं, ठाव पाहण्यास विवेकरूपी वेळू मिळत नाहीं व इतर कांहीं युक्ति योजली, तर ती अपायकारकच ठरते. हरणाच्या पोरानें जाळें कुरतडावें किंवा मुंगीनें मेरु पर्वत ओलांडावा, तितकेंच या मायेच्या पैलथडीं जाणें अशक्य आहे. जे मला सर्वभावानें भजतात, श्रीगुरु ज्यांचा कर्णधार आहे व जे आत्मज्ञानरूपी ठाव पाहण्याचा वेळू हातांत घेतात, ते मात्र हा पूर सहज तरून जातात. त्यांच्या बाबतींत हा मायापूर ऐलतीरींच नाहींसा होतो. (ज्ञा., १२, ६८-९८)

## ईश्वरच नित्यात सत्य आहे

ईश्वरभक्ति हा ज्ञानेश्वरांच्या अनुभूतिप्रधान धर्मशास्त्राचा मध्यबिंदु आहे असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. "परमेश्वर या जगांत अंतर्बाह्य भरून राहिला असूनहि 'देव नाहीं' असें कांहीं लोक सतत बडबडत राहतात, ही अत्यंत आश्चर्याची गोष्ट नव्हे काय?" असें ज्ञानेश्वर विचारतात. देव सर्वत्र कोंदला असूनहि, तो नाहीं म्हणतात, हें त्यांचें दुर्दैव नव्हे काय? अमृताच्या विहिरींत एकादा मनुष्य पडला असतां त्याचें सेवन न करितां तो बाहेर निघाला, तर त्यास अत्यंत हतभागी म्हणूं नये तर काय म्हणावें? अंधळा एक घांस अन्नासाठीं धांवतो व पायांखालचा चिंतामणि लोटून देऊन अंधळेपणानें पुढें चालूं लागतो, तशी या लोकांची स्थिति आहे. (ज्ञा., ९, ३००-३३०) हे लोक जरा डोळे उघडे ठेवून पाहतील, तर सृष्टींत देव चोहोंकडे भरलेला असल्याचें त्यांना दिसून येईल. त्याचें सर्वशक्तिमत्त्व सर्वत्र प्रतीत होत नाहीं काय? आकाशानें सर्व व्यापावें, वायूनें क्षणभरहि स्तब्ध राहूं नये, अग्नीनें जाळावें, पावसानें पृथ्वी

भिजवावी, पृथ्वीनें आपली बैठक सोडूं नये, समुद्रानें आपली मर्यादा ओलांडूं नये व पृथ्वीनें आपल्या पृष्ठभागावर सर्व भूतमात्रांचें ओझें वाहावें, ही देवाचीच आज्ञा नव्हे काय ? मी बोलवितों म्हणून वेद बोलतो, मी चालवितों म्हणून सर्व चालतात, मी हलवितों म्हणून प्राण शरीराच्या आंत-बाहेर हलतो, माझ्या आज्ञेमुळेंच काळ सर्व भूतांना ग्रासतो : निसर्गांतील या सर्व शक्ती म्हणजे माझे गुलाम आहेत. (ज्ञा., ९, २८०-८५.) "या जगांतील सर्व दृश्य नामरूपें मी आहें. जळावरील कल्लोळ जळांत असतात, त्याप्रमाणें हीं सर्व भूतें माझ्यांत आहेत. जो मला अनन्य-शरण येतो त्यासच मी जन्म-मरणांच्या फेऱ्यांतून सोडवितों. शरणागतांचें रक्षण करणारा मी एकच आहें. सूर्य ज्याप्रमाणें समुद्रांत व डबक्यांत सारखाच प्रतिबिंबित होतो, त्याप्रमाणें मी ब्रह्मादि सर्व भूतमात्रांमध्यें सुहृद्रूपानें प्रतिबिंबित होतों." (ज्ञा., ९, २८६-९०.) मनुष्यास आपण कर्ता आहों असा अभिमान उगीचच वाटतो. तो केवळ निमित्तकारण आहे हें तो विसरतो. ज्या सैन्याचा संहार व्हावयाचा असतो त्यास मी आधींच मारून टाकतों. तें निर्जीव कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें आहे. त्यांना हलाविणारी दोरी तुटली कीं, त्या बाहुल्या अस्ताव्यस्त पडतात. (ज्ञा., ११, ४६६-६७.)

## मूर्तिपूजा व मानवगुणधर्म ईश्वरास लागू नाहींत

"ईश्वर सर्व वस्तुमात्रांचें अंतिम व श्रेष्ठ कारण आहे असें गृहीत धरलें, तरी त्यास शोधावें कसें ? नश्वर मूर्तींच्या मागें लागून तो मिळेल काय ?" या प्रश्नांस ज्ञानेश्वरांनीं स्पष्ट नकारार्थी उत्तर दिलें आहें. "ज्यास कावीळ झाली आहे, त्यास सर्व पदार्थ, चांदणें देखील, पिवळे दिसतात, त्याप्रमाणें माझ्या शुद्ध स्वरूपांत अज्ञानी लोकांना दोष दिसतात ! तापानें ज्याचें तोंड कडवट झालें आहे, त्यास दूध सुद्धां विषाप्रमाणें कडू लागतें ! त्याप्रमाणेंच मी देहधारी नसतां लोक मला देहधारी मनुष्य मानतात. केवळ अज्ञानामुळें माझ्याकडेहि ते बाह्य दृष्टीनेंच पाहतात. पाण्यांत प्रतिबिंबित झालेल्या तारकांना हिरे समजून ते खाण्याच्या आशेनें एखाद्या राजहंसानें पाण्यांत उडी टाकावी, धगधगीत निखाऱ्यांना माणीक समजून एखाद्या मनुष्यानें ते आपल्या पदरांत बांधावे किंवा विहिरींतल्या

आपल्याच प्रतिबिंबाकडे पाहून त्यावर हल्ला करण्यासाठीं सिंहानें विहिरींत उडी घ्यावी, त्याप्रमाणें मी, जग व जगांतल्या वस्तू एक मानून हे लोक केवळ भ्रमानें आपली फसवणूक करून घेतात. कांजी पिऊन कधीं अमृत प्याल्याचें फल मिळेल काय? याप्रमाणें हे मूढ लोक भंग पावणाऱ्या मूर्तींत माझें स्वरूप पाहूं जातात व माझ्या खऱ्या अविनाशी स्वरूपास मुकतात." (ज्ञा., ९, १४२–१५२.) याप्रमाणें 'ईश्वर मानवदेहधारी आहे' या कल्पनेचा ज्ञानेश्वरांनीं निषेध केला आहे. "मला अनामिकाला हे लोक नांवें देतात; अकर्त्यावर कर्माचा आरोप करतात; मी विदेही असून माझ्यावर देहाचीं कर्में लादतात; मला वर्णातीताला सवर्ण व निर्गुणाला गुणी समजतात. मी हस्त–पाद–कर्ण–नेत्र–विहीन असूनहि मला हात, पाय, कान, डोळे आहेत असें हे मानतात. हे कुटुंबातीताला कुटुंबी, निराकाराला साकार, विवस्त्राला सवस्त्र व निरालंकृताला अलंकृत समजतात. मी अजन्मा असून मला हे निर्माण करतात व माझा जन्मोत्सव करतात! मी स्वयंप्रतिष्ठित असूनहि, माझी प्रतिष्ठापना करतात. मी येतहि नाहीं व जातही नाहीं, तरी हे माझें आवाहन व विसर्जन करतात. मी अनादि व स्वयंभू असूनहि मी बाल, तरुण व वृद्ध आहें असें हे मानतात. मी अद्वितीय असूनहि, हे माझी द्वितीय मूर्ति निर्माण करतात; मी कर्मातीत असूनहि हे माझ्या ठिकाणीं कर्में पाहतात; मी कधींच खात नसूनहि, 'मी नैवेद्य स्वीकारतों असें हे म्हणतात; मी विश्वांतर्यामी असूनहि 'मी द्वेषामुळें एकास मारतों, तर प्रेमानें दुसऱ्यास तारतों' असें हे अज्ञानी लोक म्हणतात. हे मानवी गुण माझ्यावर लादणारे लोक स्वतःच मूर्तिमंत अज्ञान आहेत! त्यांच्या डोळ्यांपुढें दिसणाऱ्या दगडाच्या मूर्तीस ते प्रत्यक्ष देव समजतात आणि ती भंगली कीं देव नाहीं असें म्हणून फेंकून देतात! (ज्ञा., ११, १५६–७०.)

## सर्व विश्वांत ईश्वराविषयीं भीतियुक्त आदर आहे

ईश्वर या विश्वांतील अणूरेणू व्यापून राहिला असल्यामुळें त्याच्या अनंतत्वापुढें व सर्वशक्तिमत्त्वापुढें प्रत्येकास मान वांकवावी लागते. ईश्वराच्या मनांत आपला प्रभाव दाखवावा असा विचार येतांच सर्व विश्व भयभीत होतें व त्याबरोबर

देवांचे सर्व मेळावेहि घाबरून जातात. देवा, तुझ्या भव्य व दैवी प्रकाशानें ते इतके गोंधळून जातात कीं, ते तुझ्या रूपांत मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें लपण्याचा प्रयत्न करतात. तूं त्यांच्यावर रागावशील या भीतीनें ते तुला हात जोडून नमस्कार करतात व 'हे देवा, अज्ञानसागरांत आम्ही बुडत आहों, इंद्रियांच्या जाळ्यांत अडकलों आहों, यांतून आम्हांस तुझ्यावांचून कोण सोडवील?' अशी आर्त अंतःकरणानें तुझी प्रार्थना करतात. ते तुझ्या दिव्य रूपाकडे पाहतात व प्रत्येक क्षणीं त्यांचा विस्मय वाढतच जातो. म्हणून ते तुझ्यापुढें आपल्या मुकुटमणींची ओंवाळणी करतात व तुझ्या चरणीं हात जोडून तुझ्या जयजयकाराच्या मंजुळ स्वरानें सर्व स्वर्ग दुमदुमून सोडतात!" (ज्ञा., ११, ३२६-३३६.) याप्रमाणें परमेश्वर सर्व विश्व आपल्या भयानें व्यापून टाकतो, असें येथें प्रतिपादिलें आहे.

## ईश्वर हाच सर्व विश्वाचें मूळ आहे

ईश्वर विश्वाहून भिन्न नाहीं : "मूलतः एका बीजापासून अंकुर फुटतो, अंकुरापासून खोड, खोडापासून अनेक शाखा, शाखांपासून अनेक पल्लव, पल्लवांपासून फुलें व फुलांपासून फळें उत्पन्न होतात; परंतु वस्तुतः पाहतां हा सर्व बीजाचाच विस्तार आहे. त्याप्रमाणेंच मी सर्व विश्वाचें बीज असून या विश्वाचा विस्तार माझ्याचपासून झाला आहे. या विश्वांत ब्रह्मापासुन मुंगीपर्यंत माझ्याशिवाय दुसरी वस्तु नाहीं, हें ज्ञान ज्यास झालें तोच भेदाच्या स्वप्नांतून खरा जागा झाला." (ज्ञा., १०, ९८-११८.) "जो सर्वत्र अद्वैत पाहतो व भेद पाहत नाहीं, तोच खरा ज्ञानी होय. निरनिराळीं नामें, भिन्न भिन्न कर्में व तऱ्हेतऱ्हेचे पोषाख, हेच जो खरे मानतो, तो पुनर्जन्माच्या फेऱ्यांत सांपडतो. एकाच वेलापासून लांब, वांकडीं व वाटोळीं फळें उत्पन्न झालीं, तरी त्या सर्वांची रुचि तसाच त्यांचा उपयोग एकच असतो, त्याप्रमाणें हा भूतग्राम भिन्न दिसला तरी त्यामध्यें एकच तत्त्व वसत आहे. हीं भूतें नष्ट झालीं तरी आत्मा नाश पावत नाहीं. दागिने नाहींसे झाले तरी सोनें नाहींसें होत नाहीं, याचा अनुभव ज्यास येतो त्याचेच ज्ञानचक्षु उघडले असें म्हणावें." (ज्ञा., ८,

१०५९–१०८०.) याप्रमाणें जग व ईश्वर यांच्यांत भेद नाहीं. "अवयव भिन्न असले तरी शरीर एकच असतें ना? एकाच बीजापासून उत्पन्न झालेल्या झाडास उंच, नीच फांद्या फुटत नाहींत काय? समुद्र व त्याच्या लाटा यांच्यांत जसा अभेदभाव असतो, त्याप्रमाणें मी व चराचरांतील वस्तू यांचा संबंध आहे. वह्नि व ज्वाला हीं दोन्ही वस्तुतः एक वह्नीच होत. या उत्पन्न झालेल्या जगानें जर मला झांकलें, तर जगास कोण प्रकाशित करील? मण्याच्या प्रकाशानें मणि लोपेल काय? त्याप्रमाणें जगास बाजूस सारून मला पाहणें व्यर्थ आहे. कारण, सर्व संपूर्ण जग मीच आहें." (ज्ञा., १४, ११८–२८.)

## ईश्वर वस्तुतः अज्ञेय आहे

ईश्वराचा महिमा इतका अनंत आहे कीं त्याचें पूर्ण ज्ञान होणें अशक्य आहे असें जें ज्ञानेश्वर सहज म्हणतात तें खरें आहे. ईश्वर कोण, केवढा, कोणता व केव्हां झाला यासंबंधीं निश्चित मत ठरविण्यांत अनेक कल्प गेले! उदरींच्या गर्भास आपल्या मातेचें वय कळत नाहीं, जलचरांना महासागराची खोली व त्याचा विस्तार कळत नाहींत; माशीला गगन ओलांडतां येत नाहीं, त्याप्रमाणें ऋषींना व देवांना माझें संपूर्ण ज्ञान होत नाहीं. कारण, त्या सर्वांचा व सर्व भूतमात्रांचा आदि मीच आहें. पाणी उलट पर्वतशिखराकडे वाहूं लागेल, तरच माझ्यापासून उत्पन्न झालेल्या जगास माझें ज्ञान होईल." (ज्ञा., १०, ६५–६९.) या प्रकरणीं 'मला कळलें' असें जो म्हणतो, त्यालाच कांहीं कळत नाहीं; येथें संपन्नता मिळविणें म्हणजेच दारिद्र्य! आम्हीं जाहलों असें जो म्हणतो, तो कांहींच नव्हे. वेदांपेक्षां जास्त शहाणा किंवा शेषापेक्षां जास्त बोलका कोणी आहे काय? परंतु हे वेद देखील "आम्हांस कांहीं कळत नाहीं" असें म्हणून मागें सरतात व शेष अंथरुणाखालीं दडून बसतो! सनकादिक ऋषी मला धुंडाळतां धुंडाळतां वेडेपिसे झाले. शंकरायेवढा मोठा तपस्वी कोणीहि नाहीं. तो देखील अभिमान सांडून माझ्या पायाचें तीर्थ माथां वाहतो! म्हणून थोरपणा टाकावा, ज्ञानाचा अभिमान सोडावा व जगांत लहानाहून लहान व्हावें, तेव्हां कोठें माझ्या

सान्निध येण्याची आशा आहे. सहस्ररश्मी सूर्याच्या तेजापुढें चंद्र देखील फिका पडतो; तेव्हां तेथें काजव्यानें आपल्या तेजाची घमेंड कां मारावी? म्हणून शरीर—संपत्ति व गुण या सर्वांचा अभिमान टाकून तें सर्व लिंबलोण करून ईश्वरावरून उतरून टाकावें व मग त्यास धुंडावें." (ज्ञा., ९, ३६७–८१.) वेदांच्या ज्ञानानें आत्मज्ञान मिळवितां येत नाहीं. "वेद त्रिगुणांनीं व्याप्त असल्यामुळें ते सुख—दुःखांस कारण आहेत. म्हणून अंतरींच्या आत्मसुखास विसरूं नको. सूर्य उगवतांच सर्व मार्ग दिसूं लागतात, म्हणून त्या सर्वच मार्गांनीं आपणांस जातां येईल काय? किंवा पृथ्वी जलमय झाली तरी आपणांस तहान असेल तेवढेंच पाणी घेतां येईल; त्याप्रमाणें ज्ञानी लोक वेदार्थाचा विचार करतात, परंतु अपेक्षित असें जें शाश्वत तत्त्व त्याचाच तेवढा स्वीकार करतात." (ज्ञा., २, २५६–६३.) "जो सर्वेंद्रियांना पाठमोरा झाला, त्यालाच ईश्वराचें ज्ञान लाभण्याची आशा आहे. जो महाभूतांच्या माथ्यांवर चढतो व तेथें ठायींच्या ठायीं स्थिर होतो, तोच शुद्ध स्वयंप्रकाशानें माझें अजरामर रूप आपल्या डोळ्यांनीं पाहतो. जो सकळलोकमहेश्वरास आदितत्त्वापलीकडे मानतो, तोच दगडांत परिसाप्रमाणें किंवा सर्व रसांत अमृता(पाऱ्या)प्रमाणें, सर्व संतांत श्रेष्ठ होय. तो चालत्या ज्ञानाची प्रतिमा असून त्याचे अवयव म्हणजे सुखाचे अंकुरच होत व त्याचें माणूसपण हा नुसता भास होय. जळत्या चंदनास साप आपोआप सोडून जातात, त्याप्रमाणें त्यास पापें आपोआप सोडून जातात. (ज्ञा., १०, ७२–८०.) ईश्वरास सर्वत्र पाहणें म्हणजेच त्याचें खरें ज्ञान होय. "सर्व नक्षत्रें गोळा करावयाचीं झाल्यास आकाशाची मोट गुंडाळावी; किंवा पृथ्वीच्या परमाणूंचा झाडा घ्यावयाचा झाला, तर पृथ्वीच खाकोटीस घालावी; त्याप्रमाणें माझा विस्तार पाहावयाचा झाला, तर सर्व विभूतींसह मलाच जाणावें; किंवा फांद्या, फुलें व फळें एकदम घ्यावयाचीं झाल्यास मुळासकट झाडच उपटून हातीं घ्यावें; त्याप्रमाणें सर्व विभूतिविशेष जाणावे अशी इच्छा असल्यास त्यानें माझें एक निर्दोष रूपच पाहावें. कारण, अनंत विभूतींच्या मागें धांवणें व्यर्थ आहे. म्हणून मला पूर्णपणें जाणणें हेंच उत्तम होय." (ज्ञा., १०, २५९–६३.)

## अर्जुनाची विश्वरूप पाहण्याची उत्कंठा

भगवद्गीतेंतील या मुद्द्याचा विचार ज्ञानेश्वरांनीं विस्तारानें केला आहे. श्रीकृष्णानें अर्जुनाची इच्छा पूर्ण करण्याकरतां विश्वरूप धारण केलें, हा विषय ज्ञानेश्वरांना फार जिव्हाळ्याचा वाटतो. म्हणून त्याचें वर्णन त्यांनीं फार बहारीनें केलें असून विश्वरूप व विश्वात्मा यांचा परस्पर-संबंध काय हें फार सूक्ष्मपणें विशद केलें आहे. " आपल्यापुढें असलेलें श्रीकृष्णाचें मानवदेही रूप पाहण्यांत कांहीं विशेष नाहीं. त्याचें गूढ विश्वरूप पाहावें अशी अर्जुनाची तीव्र इच्छा होती व म्हणून तें विश्वरूप दाखविण्यास त्यानें श्रीकृष्णास विनंति केली. बाह्य जगांत मला सर्वेश्वरास पाहतां येईल काय ? पूर्वीं कोणत्याहि आवडत्या भक्तानें जो प्रश्न श्रीकृष्णास विचारण्याचें धाडस केलें नव्हतें, तो प्रश्न अर्जुनानें त्यास विचारला. मी श्रीकृष्णाच्या कितीहि सलगीचा व जवळचा असलों, तरी लक्ष्मीपेक्षां आवडता कसा होईन ? मीं श्रीकृष्णाची कितीहि प्रेमानें सेवा केली असली, तरी ती गरुडाच्या सेवेच्या पासंगास तरी लागेल काय ? मी सनकादिकांइतका देवास जवळचा आहें काय ? गोकुळच्या गोपींच्या प्रेमापेक्षां माझें प्रेम कसें श्रेष्ठ ठरेल ? " बरें, जर हें विश्वरूप दाखविण्याची विनंति करण्याचें धाष्टर्य मी आतां केलें नाहीं, तर माझें सर्व आयुष्य दुःखांत जाईल ", असा विचार करून अर्जुनानें विश्वरूप दाखविण्याची श्रीकृष्णास प्रार्थना केली. " ( ज्ञा., ११, २८-३८. ) ज्या विश्वात्म्याच्या संकल्पानें ही लोकपरंपरा उत्पन्न होते व नाहींशी होते, तें तुझें स्वतःचें मूळ, अस्सल रूप मला दाखीव. यापासूनच दोन बाहूंचें रूप वा चतुर्बाहुरूप धारण करून तूं देवांचे ताप नष्ट करतोस ! मत्स्य-कूर्मादि अवतार धारण करून त्या त्या अवतारांचीं कार्यें पूर्ण झाल्यावर पुनः ज्या मूळ रूपांत तूं संकोच पावतोस, ज्या रूपाचें उपनिषदें वर्णन करतात व जें रूप योगी लोक आपल्या हृदयांत सांठवून ठेवतात, ज्यामुळें सनकादिकांना स्फूर्ति मिळते, ज्या अगाध विश्वरूपाची कीर्ति मीं आपल्या कानांनीं ऐकली आहे, तें विश्वरूप पाहण्यास मी उतावीळ झालों आहें व तूं प्रसन्न होत असशील तर मला हा वर दे," अशी अर्जुनानें श्रीकृष्णास विनंति केली. ( ज्ञा., ११, ८१-९८. )

**दिव्यदृष्टीनें विश्वरूपदर्शन**

श्रीकृष्णाच अर्जुनास विश्वरूप दाखविण्यास उत्सुक होते; म्हणून त्यास चर्मचक्षूंनीं तें रूप पाहतां येईल किंवा नाहीं याचा विचार न करतांच त्यांनीं त्यास एकदम आपलें अद्भुत विश्वरूप दाखविलें; परंतु अर्जुन अद्याप बेसावधच होता " मीं तर तुला विश्वरूप दाखविलें; परंतु तूं तें पाहिलेंच नाहींस ! " असें श्रीकृष्ण म्हणाले. " तुझें विश्वरूप माझ्या या चर्मचक्षूंस दिसणार नाहीं. तूं मला दिव्य चक्षू देशील, तरच तें मला पाहतां येईल " असें अर्जुनानें सांगितलें. " आरसा साफ करून अंधळ्यापुढें धरला किंवा उत्तम संगीत बहिऱ्यापुढें गाइलें, तर त्याचा काय उपयोग ? " ( ज्ञा., ११, १५४–५९. ). तेव्हां श्रीकृष्णांनीं अर्जुनास दिव्य दृष्टि दिली व त्याला विश्वात्म्यास पाहतां आलें आणि अज्ञानाचा अंधार नाहींसा होऊं लागला. दिव्य चक्षूंच्या प्रकाशामुळें अर्जुनाची ज्ञानदृष्टि फांकली व त्याला एकदम दिव्य ऐश्वर्य व तेज हीं दिसलीं ! त्या अगाध चमत्कार–महासागरांत त्याचें चित्त बुडून गेलें. त्याचें मन विस्मयानें स्तिमित झालें ! त्याच्या मनाचें मनपण हरपलें व बुद्धि स्तंभित झाली ! आश्चर्यानें तो चोहोंकडे पाहूं लागला तों त्याच्यापुढें नेहमीं असलेलें चतुर्भुज रूपच त्यास सर्वत्र दिसूं लागलें ! त्यानें डोळे मिटले तों त्याच्यापुढें कृष्णाचें रूप उभें होतें. त्यानें डोळे उघडले तों त्याच्यापुढें विश्वरूप होतें ! " ( ज्ञा., ११, १७६–९६. ) विश्वात्म्याच्या तेजाच्या अपरंपार पुरामुळें स्वर्गांतील देवादिक भयभीत झाले, परमात्म्याचें तें दिव्य सामर्थ्य पाहून अर्जुनाचे हातपाय गळले व त्याचा आत्मा शरीर सोडून जातो कीं काय असें त्यास वाटूं लागलें ! तो अद्भुत देखावा म्हणजे भय, आश्चर्य व नावीन्य यांचें संमिश्रणच होतें ! तें अमर्याद व अनंत तेज अर्जुनास असह्य वाटून त्यानें त्याची स्तुति आरंभिली. " मी सर्व अपराधांची राशि आहें. माझ्या हातून मागेंपुढें कांहीं अयोग्य वर्तन घडलें असेल, तर त्याची तूं मातेप्रमाणें क्षमा कर. सर्व गाळ घेऊन ओढा वाहत समुद्राकडे आला, तर समुद्र त्यास आपल्या पोटीं समावीत नाहीं काय ? प्रीतीमुळें किंवा प्रमादामुळें माझ्याकडून तुझ्याविरुद्ध वर्तन घडलें असेल त्या सर्वांची देवा, मला क्षमा कर." अशी अर्जुनानें त्या सर्वेश्वराची प्रार्थना केली ( ज्ञा., ११, ५५५—

६०.) व त्या दिव्य दृश्यापुढें दंडवत घातलें. त्याचें हृदय सात्त्विक भावनांनीं भरून आलें, त्याचा कंठ दाटला व त्या अपराधसागरांतून बाहेर काढण्याविषयीं त्यानें श्रीकृष्णास विनाविलें. पिता आपल्या पुत्राचे सर्व अपराध द्वैतभाव सोडून साहत नाहीं काय? किंवा मित्राचा दांडगेपणा मित्र शांतपणें सहन करीत नाहीं काय? (ज्ञा. ११, ५६७-७४.)

## अर्जुनाचें धसाळपण

विश्वरूप धारण केलेले श्रीकृष्ण इतका वेळ शांत होते; परंतु अर्जुन भयंकर घाबरला आहे असें जेव्हां त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्याच्या धसाळपणाबद्दल त्यांस आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, "तुझ्यावर सर्वस्वीं प्रसन्न होऊन तुला मीं दाखविलेल्या विश्वरूपाचें महत्त्व ओळखून त्याचा लाभ न घेतां तूं भ्याडासारखा बडबडूं लागला आहेस! ज्यापासून सर्व अवतारांची उत्पत्ति तें माझें अनंत व परात्पर रूप आजपर्यंत तुझ्यावांचून दुसऱ्या कोणींहि पाहिलें किंवा ऐकिलें नाहीं. हा अमृताचा समुद्र अकस्मात् तुला प्राप्त झाला असतां आपण त्यांत बुडून मरूं अशी तुला भीति वाटते! सोन्याचा पर्वत पाहून हा फार मोठा आहे म्हणून तूं त्याचा अव्हेर करतोस! दैवानें चिंतामणि हातीं आला असतां हा जड आहे म्हणून टाकून देतोस! दारीं चालत आलेली कामधेनु पोसवत नाहीं म्हणून हांकून लावतोस! याप्रमाणें हें महातेजरूपी माझें ऐश्वर्य सर्वस्वीं हातीं आलें असतां तूं गांवढळासारखा भयभीत होतोस! हें रूप जरी घोर व विकृत असलें, तरी तें थोर आहे; म्हणून त्यावरच तूं पूर्ण विश्वास ठेव व कृपणाचें मन ज्याप्रमाणें आपल्या द्रव्याच्या ठेवीपाशींच स्थिर राहतें, त्याप्रमाणें या रूपावरच तूं आपलें मन स्थिर कर. हें रूप त्वां कधींच पाहिलें नव्हतें, म्हणून तुला भीति वाटते. तथापि यावरच तुझें सर्व प्रेम असूं दे." असें म्हणून अर्जुनाच्या सहनशीलतेचा अंत न पाहतां श्रीकृष्णांनीं पुनः मानवी रूप धारण केलें. (ज्ञा., ११, ६०९-३९.)

## अव्यक्ताच्या उपासकांस व्यक्ताचा लाभ.

अर्जुन विश्वरूप पाहण्यास समर्थ नव्हता, म्हणून त्याच्यासाठीं पुनः श्रीकृष्णांनीं मनुष्यरूप कसें धारण केलें याचें ज्ञानेश्वरांनीं अनेक उपमा देऊन

वर्णन केलें आहे : " अमूल्य रत्न पाहून त्याची खरी किंमत अर्जुनास ठरवितां आली नाहीं; किंवा सुंदर कन्या पाहून ती एकाद्या वरास पसंत पडूं नये तसें अर्जुनाचें झालें. सोन्याची लगड घेऊन आपल्या इच्छेप्रमाणें दागिने घडवावे व जीवास न आवडल्यामुळें ते दागिने आटवून टाकावे तसें श्रीकृष्णांनीं केलें. विश्वरूप कापडाची घडी अर्जुनास दाखविण्यासाठीं त्यांनीं उघडली. परंतु अर्जुन योग्य गिऱ्हाईक न ठरल्यामुळें पुनः त्याची पूर्ववत् घडी केली." (ज्ञा., ११, ६४०–४६.) ज्यांना अव्यक्त परमात्म्यास पाहण्याची इच्छा असते त्यांना व्यक्त रूपहि प्राप्त होतें, हा या सर्व वर्णनाचा मतितार्थ आहे, असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें. हाच विषय भगवद्गीतेच्या व ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायांत प्रामुख्यानें चर्चिलेला आहे. याच अध्यायांत "व्यक्त व अव्यक्त यां-पैकीं श्रेष्ठ कोणतें व व्यक्तोपासक भक्त श्रेष्ठ का अव्यक्तोपासक तत्त्वज्ञानी श्रेष्ठ ?" हा प्रश्न विचारला असतां, "अव्यक्तापेक्षां व्यक्त व ज्ञान्यापेक्षां भक्त श्रेष्ठ" असें उत्तर श्रीकृष्णांनीं स्पष्ट व निःसंदिग्धपणें दिलें आहे. "वर्षाकाळांत उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या नदीप्रमाणें ज्याची भक्ति वाढत जाते, तो भक्त मला प्रिय आहे" असें श्रीकृष्णांनीं सांगितलें आहे. "सर्वेंद्रियांसहित मन माझ्याकडे लावून जे रात्रंदिवस माझी उपासना करतात त्यांना मी परमश्रेष्ठ मानतों." (ज्ञा., १२, ३४–३९.) आतां सोऽहंभावारूढ होऊन जे निरवयव अक्षराची उपासना करतात ते देखील शेवटीं मलाच येऊन मिळतात. हें अक्षरब्रह्म मनास व बुद्धीसहि अगोचर असून इंद्रियांच्या आवांक्याबाहेरचें आहे. याचें ध्यान करणें कठिण असून हें कोणाहि व्यक्तामध्यें सांपडत नाहीं. हें सर्वत्र, सर्व-पणें, सर्वांमध्यें, सर्व काळीं असतें. ध्यानानें याचें आकलन होत नाहीं; हें चळत नाहीं, टळत नाहीं; हें सत्‌हि नाहीं व असत्‌हि नाहीं; हें सतत योगाभ्यासानें सुद्धां साध्य होत नाहीं; अक्षरप्राप्तीसाठीं केलेली कडक तपश्चर्या व केलेला योगाभ्यास त्या उपासकांना फलद्रूप न होतां त्यांना कष्टसागरांत मात्र लोटतात. (ज्ञा., १२, ४०–५९.)

## ब्रह्मस्वरूप-वर्णन

प्रत्यक्ष अनुभवाच्या दृष्टीनें, अव्यक्तापेक्षां व्यक्त श्रेष्ठ मानलें, तरी तात्त्विक दृष्ट्या निर्विकल्प अक्षरब्रह्माची कल्पना वा अक्षरब्रह्म हें ध्येयच श्रेष्ठ ठरतें, असें ज्ञानेश्वरांनीं अनेकदां प्रतिपादिलें आहे : " तें एकसरां आंत व बाहेर, जवळ व दूर असतें; तें आद्वितीय आहे. त्याच्या निरंतर तेजाला हलणें माहीत नाहीं. तें विश्वाच्या आधीं, मध्यें व अंतीं अखंड असतें. सकाळ, दुपार व संध्याकाळ हे फरक झाले तरी गगन जसें पालटत नाहीं, त्याप्रमाणें तें विश्वरूप अखंड व सारखें राहतें; तें ब्रह्मा, विष्णु व रुद्र हीं नांवें धारण करतें; गुणत्रयाचा लोप होतो, तेव्हां बाकी राहणाऱ्या शून्याप्रमाणें तें आहे. तें अग्नीचें दीपन, चंद्राचें जीवन व सूर्याचें नयन आहे." ( ज्ञा., १३, ९१५–३८. ) त्यानें व्यापृत नाहीं अशी कोणतीच वस्तु या बाह्य जगांत नाहीं. म्हणून त्यास विश्वबाहु म्हणतात; तें सर्वांठायीं एकाच वेळीं असतें, म्हणून त्यास विश्वांघ्रि असें नांव आहे. सर्व वस्तू सदा त्याच्या दृष्टीपुढें असतात, म्हणून त्यास विश्वतश्चक्षु म्हणतात; तें सर्वांच्या शरीरांवर नांदतें, म्हणून विश्वमूर्धा व तें सर्वपणें सर्वांचा उपभोग घेतें म्हणून विश्वतोमुख आहे. हें सर्व खरें असलें तरी वस्तुतः त्यास हात, पाय, डोळे इत्यादि कांहींच नाहींत, असें म्हणावें लागतें. तें सर्व शून्यांचें सार आहे. तरी त्याचें कांहीं तरी वर्णन करावयास हवें म्हणूनच वरील शब्दांनीं त्याचें वर्णन करावयाचें इतकेंच. कारण, शून्याची कल्पना स्पष्ट करून दाखवावयाची झाली तर जसें वर्तुळ काढावें लागतें, त्याप्रमाणें अद्वैताची कल्पना द्वैताच्या द्वारेंच मांडावी लागते." ( ज्ञा., १३, ८७३–८९ )

## चित्सूर्यवर्णन

सोळाव्या अध्यायाच्या आरंभीं ज्ञानेश्वरांनीं ब्रह्मास चित्सूर्याची उपमा देऊन जें त्याचें वर्णन केलें आहे तें सुप्रसिद्ध व अत्यंत बहारीचें आहे. प्लेटोनें आपल्या " लोकसत्ताक राज्य " या संवादांत वर्णिल्याप्रमाणें ज्ञानेश्वरांनींहि या अन्तिमसत्यरूपी चित्सूर्य-ब्रह्माचें वर्णन मालारूपकांनीं केलें आहे : " नेहमींचा आकाशांतील सूर्य उगवला, तर सृष्ट पदार्थ दिसूं लागतात; याउलट हा अन्तिम-

सत्यस्वरूप सूर्य उदयास आला तर विश्वाभास पूर्ण नाहींसा होतो ! तो ज्ञानरूपी व अज्ञानरूपी चांदण्यांना गिळून 'ज्ञानियां'ना आत्मबोधाचा प्रकाश देतो. आत्मज्ञानाचा अरुणोदय झाला कीं जीवरूपी पक्षी 'देह व अहंता'रूपी आपलें घरटें सोडून आत्मज्ञानार्थ बाहेर पडतात. हे जीवरूपी चिद्भ्रमर लिंगदेहाच्या कमळांत इतका वेळ अडकून पडले होते; परंतु चित्सूर्याचा उदय होतांच ते बंधमुक्त होऊन स्वैरपणें आत्मप्रकाशांत उडूं लागले ! बुद्धि व बोध ( विवेक व अनुभूति) हें चक्रवाकांचें जोडपें शब्दांच्या अडचणीच्या जागीं सांपडून, भेदनदीच्या दोनहि तीरांवर विरहानें वेडें होऊन ओरडत होतें. हा चिद्गगन–भुवन–दिवा उगवतांच त्यांचा विरह नाहींसा होऊन, त्यांना ऐक्याचा आनंद अनुभवावयास मिळाला ! या चित्सूर्याचे विवेक–किरण ज्ञान–सूर्यकांतमणीवर पडले, तर त्यांपासून ठिणग्या उडून संसाररूपी अनेक अरण्यें जळून खाक होतात ! या चित्सूर्याचे प्रखर किरण जीवात्म्याच्या निबर जमिनीवर पडले, तर महासिद्धीचा पूर येऊन मृगजळाचा भास होतो. हा चित्सूर्य आत्मानुभूतीच्या मध्यान्हीं माथ्यावर आला म्हणजे आत्मभ्रांतीची छाया पायांतळीं जाते व मुमुक्षू जीवांस या चित्सूर्याशीं आपलें पूर्ण ऐक्य अनुभवावयास मिळतें." 'दिवस व रात्र, चांगलें व वाईट, इत्यादि द्वंद्वांपलीकडे असलेला व प्रकाश्य वस्तूशिवायच प्रकाशाचा सुकाळ करणारा हा ज्ञान-मार्तंड कोणीं पाहिला आहे ?' असा रोखठोक प्रश्न ज्ञानेश्वर विचारतात. ( ज्ञा., १६, १–१६. )

# ३ नीति-विचार

## इंद्रियांचें बळकटपण

आतां ज्ञानेश्वरांच्या नीतिविषयक शिकवणीचा विचार आपण करूं. या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे. ती म्हणजे इतर संतांप्रमाणें ज्ञानेश्वरांचाहि इंद्रियांवर विश्वास नाहीं. " या इंद्रियांचें बळ इतकें जबरदस्त असतें कीं, जे योगाभ्यास करतात व आपल्या मनाभोंवतीं यमानियमांचें कुंपण घालून ज्यांनीं आपलें मन आपल्या मुठींत धरलेलें असतें, अशा योग्यांना देखील, हीं इंद्रियें हडळीनें मंत्रज्ञाला भुलवावें त्याप्रमाणें, कासावीस करून टाकतात ! योगाभ्यास बळावला असतां, नवीन विषय व नवीन शक्ती निर्माण करून, हीं त्या योग्याच्या मनास भुरळ पाडतात व त्यास योगाभ्यासापासून च्युत करतात. इतकें भयंकर सामर्थ्य या इंद्रियांमध्यें आहे." ( ज्ञा., २, २११–१४. )

## सद्गुणसमुच्चयः अमानित्व

इतर नीतिशास्त्रज्ञांप्रमाणें ज्ञानेश्वरांनींहि इंद्रियांचें सामर्थ्य केवढें आहे हें सांगितलें आहे; परंतु अनेक सद्गुणांचें जें सखोल व मार्मिक वर्णन ज्ञानेश्वरांनीं केलें आहे, त्यांत त्यांची उच्च प्रतिभा व त्यांचे विशेष गुण दिसून येतात. तेराव्या अध्यायांत खऱ्या परमार्थास लागणाऱ्या सर्व सद्गुणांचें विस्तृत वर्णन दिलें आहे, त्याचा ज्ञानेश्वरांना आधार म्हणून फार उपयोग झाला आहे. प्रत्येक सद्गुणाचें महत्त्व वाचकांच्या मनावर पूर्णपणें बिंबविण्याकरितां ज्ञानेश्वरांनीं इतकीं रूपकें वापरलीं आहेत कीं, अलंकारिक भाषेंत नीतिशास्त्राचें वर्णन करणाऱ्या सर्व लेखकांत ज्ञानेश्वर श्रेष्ठ ठरतात, यांत शंकाच नाहीं. या अलंकारसंभाराशिवाय नीतिशास्त्राचें विवेचन रूक्ष व नीरस झालें असतें. या प्रत्येक सद्गुणाचें वर्णन करतांना किती भरपूर माहिती ज्ञानेश्वरांनीं दिली आहे याची कल्पना पुढें दिलेलें वर्णन वाचून वाचकांस सहजीं येईलच. प्रथम अमा-

नित्वाचें वर्णन पाहूं: "ज्यास स्तुतीचा प्रत्येक शब्द ओझ्यासारखा वाटतो, तोच खरा नम्र पुरुष होय. त्याच्या अंगीं खरोखरच असलेल्या गुणांचें वर्णन केलें तरीहि तो व्याधानें अडविलेल्या हरणाप्रमाणें गोंधळून जातो. सन्मान केला असतां, भोंवऱ्यांतून पोहणाऱ्याचे दोनहि हात दमून संकोच पावतात, त्याप्रमाणें तो संकोच पावतो. तो मोठेपणा अंगीं येऊंच देत नाहीं. पूज्यता डोळ्यांनीं पाहूं नये, स्वकीर्ति कानांनीं ऐकूं नये, हा अमुक आहे अशी आठवणहि लोकांना उरूं नये अशी त्याची इच्छा असते. नमस्कार केला असतां त्यास मरणप्राय दुःख होतें. बृहस्पतीसारखा सर्वज्ञ असला तरी लोकांमध्यें आपली कीर्ति होईल या भीतीनें तो वेडामध्यें दडून राहतो, चातुर्य लपवितो, महत्त्व घालवितो व आवडीनें पिसेपण मिरवितो. जगानें अवज्ञा करावी व नातलगांनीं सोयरीक टाकावी, अशी त्याची तीव्र इच्छा असते. हा जिवंत आहे का मेला आहे याची कल्पनाहि लोकांस येऊं नये, इतक्या शांतपणें राहावें असें त्यास वाटतें. तो इतक्या हळुवारपणें चालतो, कीं तो चालतो का वाऱ्यानें ढकलला जातो, याचा लोकांस भ्रम पडावा! "माझें जिवंतपण लोपूं दे, नामरूप नाहींसें होऊं दे व सर्व भूतमात्र मला सोडून जाऊं देत" असें तो म्हणतो. असा पुरुष नेहमीं एकान्त सेवितो व जणूं एकान्तामुळेंच जगतो. तो वाऱ्याशीं मैत्री करतो, आकाशाशीं बोलतो व रानांतलीं झाडें त्यास स्वतःच्या जिवाइतकीं प्रिय वाटतात." (ज्ञा., १३, १८५–२०२.) पुनः नवव्या अध्यायांत देखील ज्ञानेश्वरांनीं संतांच्या या नितान्त नम्रतेचें वर्णन केलें आहे. असे संत ब्रह्मापासून चिलटापर्यंत सर्व भूतमात्रांना आपल्यासमान लेखतात. ते पाहिलेल्या सर्व वस्तू लहान–मोठ्या न म्हणतां वा सजीव वा निर्जीव न जाणतां आपलें स्वरूप असें समजून सरळ दंडवत घालतात. ते आपला मोठेपणा आठवत नाहींत; दुसऱ्याची कृति योग्य कीं अयोग्य हें ते जाणत नाहींत; कोणाहि व्यक्तीचें नांव घेतलें कीं एकसारखें नमन करणेंच त्यांना आवडतें. जसें पाणी उंचावरून निमुटपणानें खालीं वाहत येतें, त्याप्रमाणें पाहिलेल्या प्रत्येक प्राणिमात्रास नमन करणें हा त्यांचा स्वभाव बनतो. किंवा फळांनीं झाडाच्या फांद्या भरल्या म्हणजे

त्या सहजच खालीं लवतात, त्याप्रमाणें अखिल जीवमात्रांपुढें ते नम्र होतात. ( ज्ञा., ९, २२१–२७. )

**अदंभित्व**

"कृपण ज्याप्रमाणें प्राण गेला तरी आपला ठेवा उघडा करीत नाहीं, त्याप्रमाणें अदांभिक पुरुष प्राण–संकटीं पडला तरी आपलें सुकृत आपण होऊन शब्दांनीं प्रकट करीत नाहीं. ज्याप्रमाणें लाथरी गाय आलेला पान्हा पळविते किंवा प्रवासांत धनिक आपलें धन लपवितो किंवा कुलवधू आपले अवयव लपविते किंवा शेतकरी पेरलेलें धान्य झांकतो, त्याप्रमाणें अदांभिक आपलें दान लपवितो. तो कोणाची पूजा करीत नाहीं, कोणाची खुशामत करीत नाहीं. आपला धर्म वाग्ध्वजावर बांधून फडफडत ठेवणें त्याला माहीत नसतें. शरीर–भोगांविषयीं तो अतिशय कृपण असला, तरी धर्माविषयीं थोडें-बहुत मुळींच म्हणत नाहीं. घरीं आपत्तीनें गांजला असला, तरी दानाच्या बाबतींत तो कल्पतरूशीं पैज मारतो. तो स्वधर्मीं थोर व योग्य ठिकाणीं उदार असतो. तो आत्मचर्चेंत चतुर व इतर विषयांत जणूं वेडयासारखा असतो. केळीचें झाड वस्तुतः हलकें व पोकळ असतें, तरी त्याचीं फळें फार जड व रसानें भरलेलीं असतात. किंवा मेघाचें अंग जणूं वाऱ्यानें उडून जाईल इतकें हलकें दिसतें, परंतु त्यापासून मुसळधार वर्षाव होतो ! या चिन्हांचा ज्याच्यामध्यें उत्कर्ष झाला, त्याच्या अंगीं अदांभिकत्व पूर्णपणें बाणलें असें जाणावें."
( ज्ञा., १३, २०३–१७. )

**अहिंसा**

यानंतर ज्ञानेश्वरांनीं अहिंसेचें वर्णन केलें आहे. अहिंसा अनेक प्रकारची असते. शरीरानें, शब्दानें किंवा मनानें कोणासहि यत्किंचित् देखील न दुखविणें ही अहिंसा होय. या तीनहि प्रकारच्या अहिंसेचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं फार उत्तम प्रकारें केलें आहे. "आदर्श संत पाण्याची स्थिरता मोडेल या भीतीनें कोणत्याहि प्रवाहांतून जात नाहींत. बगळा ज्याप्रमाणें पाण्याच्या लाटा

न ओलांडतां वा न फोडतां व पाण्याची स्थिरता न मोडतां, हळुवारपणें पण वेगानें आपल्या अभिलाषाकडे लक्ष देऊन पाण्यांत पाऊल टाकतो, त्याप्रमाणें ज्यांच्या अंगीं अहिंसा-तत्त्व पूर्णपणें बाणलें आहे असे संत आपल्या ध्येयाकडे पूर्ण लक्ष देऊन पृथ्वीवर पाऊल टाकतात. किंवा केसर चुरडून गळेल काय या शंकेनें भुंगा कमळावर अत्यंत हळुवारपणें पाय ठेवतो, त्याप्रमाणें प्रत्येक परमाणूंत सूक्ष्म जीव लपेटून राहिले आहेत हें जाणून कारुण्यपूर्ण अंतःकरणानें ते आपलीं पावलें जपून टाकतात. ते चालतात तो मार्गच कृपेचा बनवितात, दिशा प्रेमानें भरून टाकतात व सर्व जीवांच्या खालीं जणूं आपला जीवच आंथरतात! आपल्या दांतांची तीक्ष्ण टोकें लागतील कीं काय या भीतीनें अगदीं हळुवारपणें मांजरी आपल्या पिलांना आपल्या तोंडांत धरते,त्याप्रमाणें ते अति हळुवारपणें पृथ्वीवर चालतात.(ज्ञा.,१३,२४१-५५.) "कृतार्थ झाल्यामुळें सिद्ध पुरुषांचे मनोरथ जसे निर्व्यापार राहतात, त्याप्रमाणें त्यांचे हात कांहीं व्यवहार करीत नाहींत. वाऱ्याला हिसडा बसेल किंवा आकाशाला नख लागेल म्हणून ते आपले हात मुळींच हलवीत नाहींत; अंगावर बसलेली किंवा डोळ्यांत शिरूं पाहणारी माशी ते झाडून टाकतील, किंवा पशुपक्ष्यांकडे रागानें पाहतील ही गोष्टच कशाला? ते एकादी काडी सुद्धां उगारीत नाहींत, मग शस्त्रांचा प्रश्न निघतोच कशाला? लीलेनें कमळ हातीं धरणें किंवा फुलांची माळ झेलणें हें त्यांना गोफणीनें दगड मारण्याइतकें कठोर वाटतें! ते अभय देण्यासाठींच हात उचलतात, पडलेल्यास वर उचलण्यासाठींच हात देतात किंवा आपत्तीनें गांजलेल्यांना कुरवाळण्यासच आपल्या हातांनीं हळुवारपणें त्यांच्या अंगांस स्पर्श करतात. व हें सर्व ते इतक्या जिव्हाळ्यानें व हळुवारपणें करतात कीं, त्यांच्या स्पर्शापुढें दक्षिणेचा मलय पर्वतावरून येणारा वारा देखील कठोर व खुपतोसा वाटतो! (ज्ञा., १३,२७८-९०.) अशा पुरुषाची दृष्टि देखील अगदीं निरुपद्रवी असते. सर्व वस्तुमात्रांत भरून असलेलें ब्रह्मरूप आपल्या नजरेआड होईल या भीतीनें तो दुसऱ्या कोणत्याहि बाह्य वस्तूकडे पाहत नाहीं. तरी त्यानें एकादे वेळीं अंतःकरणाच्या कृपेच्या बळें डोळे उघडून पाहिलेंच, तर त्याची दृष्टि चंद्रबिंबापासून निघणाऱ्या अमृतधारांपेक्षां कोमल व आनंददायक वाटते." (ज्ञा., १३, २७३-७६.) "अशा श्रेष्ठ साधुपुरुषाची

भाषाहि फार मृदु व कोणासहि न बोंचणारी असते. आधीं त्याच्या अंतःकरणांत स्नेह पाझरतो व मागून तोंडावाटें अक्षरें येतात. 'कृपा आधीं व मग शब्द' अशी त्याच्या भाषणाची स्थिति असते. अशा पुरुषाचे शब्द कोणास खुपतील ? कोणाच्या मनाची शांति भगेल या भीतीनें अथवा कोणाची भुवई किंचित् वांकडी होईल म्हणून तो अबोलच राहतो. चुकून लोभानें वा आग्रहानें कोणाशीं बोलला, तर त्यास तो आईबापांसारखा वाटतो. त्याचे शब्द ऐकले कीं नादब्रह्मच जणूं आकारास आलें आहे असें वाटतें. त्याचे शब्द सत्य व मुदु, मोजके आणि रसाळ व अमृताचे जणूं कल्लोळ असे वाटतात. विरोध, वाद, जोर, मर्मभेद, उपहास, छळ, क्लेश, शंका, कपट व दगलबाजी इत्यादिकांना त्याच्या वाचेनें जणूं कायमचा रामराम ठोकला आहे, असें वाटतें." (ज्ञा., १३, २६१-७२.) शेवटीं, त्याचें मनहि त्याच्या शरीराप्रमाणें किंवा वाचेप्रमाणें अत्यंत अहिंसात्मक असतें. कारण, मन जर मूलतः निरुपद्रवी नसेल, तर वाचा व कृति निरुपद्रवी असूंच शकणार नाहींत. प्रथम जमिनींत बीं पेरावें तेव्हां मग तें वृक्षरूपानें दृग्गोचर होतें, त्याचप्रमाणें मनाची कृति इंद्रियांच्या द्वारें प्रकट होते. आपल्यास हवी ती वृत्ति प्रथम मनांत उठते आणि मग, ती वाचा, दृष्टि किंवा हात यांच्या द्वारें व्यक्त होते. म्हणून मनाचें मनपणच जेव्हां मोडतें, तेव्हां सूत्रधारांवीण असलेल्या कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें इंद्रियें आपोआप उपडीं पडतात. समुद्रास भरती येते, तेव्हां खाडया आपोआपच भरतात, त्याचप्रमाणें स्वसंपत्तीनें चित्त इंद्रियांस संपन्न करतें. अहिंसा म्हणजे काय हें ऐकावें, ग्रंथांतरीं पाहावें अशी जेव्हां कोणास इच्छा होते, तेव्हां त्यानें मूर्तिमंत अहिंसारूप अशा साधुपुरुषास पाहावें म्हणजे अहिंसेची पूर्ण कल्पना येईल. (ज्ञा., १३, २९३-३१३.)

### क्षांति व आर्जव

यापुढें क्षमा या सद्गुणाचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं केलें आहे. आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक या त्रिविध तापांचे समुदाय जरी त्याच्यावर कोसळले, तरी तो साधुपुरुष त्यांखालीं वांकत नाहीं. तो उन्हानें तापत नाहीं, थंडीनें

कांपत नाहीं; कोणतीहि आपत्ति आली तरी तो भीत नाहीं. चराचर भूतमात्रामुळें पृथ्वीस दाटी झाली असें वाटत नाहीं, त्याप्रमाणें नाना प्रकारच्या द्वंद्वांमुळें तो श्रमत नाहीं. समुद्र ज्याप्रमाणें पुरासकट आलेल्या नदीनदांना आपल्या पोटीं जागा देतो, त्याप्रमाणें त्याला सहन होत नाहीं असें कांहींच नाहीं. किंबहुना आपण सहन करतों ही जाणीवहि त्यास राहत नाहीं. (ज्ञा., १३, ३४४–५१.) ज्ञानेश्वरांच्या मतें ही स्वयंक्षांति होय. ऋजुतेचें किंवा सरळपणाचें वर्णन करतांना ज्ञानेश्वर सांगतात कीं, " सूर्य ज्याप्रमाणें कोणताहि भेदभाव न करतां सर्वांस सारखा प्रकाश देतो, त्याप्रमाणें सिद्ध पुरुष सर्वांशीं सारखा वागतो. आकाश ज्याप्रमाणें सर्वांसच जागा देतें, त्याप्रमाणें तो सर्वांनाच संभाळून घेतो. माणूस पाहून त्याचें मन किंवा वर्तन बदलत नाहीं. अनादिकालापासून सर्व जगच त्याच्या ओळखीचें आहे. जुनाट सोयरीक असल्यामुळें, आपपर ही भाषा तो जाणत नाहीं. कमल उमलतें म्हणजे त्यांत ज्याप्रमाणें मुकुलितपणा ( झांकलेलें असें ) कांहींच राहत नाहीं, त्याप्रमाणें त्याच्या अंतःकरणांत गुप्त किंवा खासगी असें कांहींच नसतें. अमृताच्या धारेप्रमाणें त्याचें अंतःकरण सरळ असतें. किंबहुना तो या सर्वांचें माहेरघर आहे." (ज्ञा., १३, ३५६–६७.)

## आचार्योपासन

गुरुसेवा या सद्गुणानें ज्ञानेश्वरांचें लक्ष विशेषच वेधिलें असून त्याचें वर्णन अतिसूक्ष्मपणें करण्यांत त्यांनीं यत्किंचितहि कसूर केलेली नाहीं. " सर्व जलसमृद्धि घेऊन गंगा समुद्रास मिळते किंवा अनुभूति ज्याप्रमाणें शेवटीं ईश्वराच्या नामांत प्रविष्ट होते, त्याप्रमाणें ज्यानें आपलें अंतर्बाह्य सर्व जीवित गुरूस अर्पिलें व जो आपण भक्तीचें घर बनून राहिला, तोच खरा गुरुभक्त होय. विरहिणी पतिव्रतेस ज्याप्रमाणें आपल्या वल्लभाचा ध्यास लागतो, त्याप्रमाणें फक्त गुरुगृह ज्या ठिकाणीं आहे त्या ठिकाणींच त्याचें मन रमतें. हें माझें संकट केव्हां नष्ट होईल व माझे स्वामी गुरुदेव मला केव्हां भेटतील असें तो सारखें विचारीत राहतो व त्यास एकेक क्षण युगापेक्षांहि मोठा वाटतो. गुरुग्रामाहून कोणी आला किंवा त्यांनीं स्वतः कोणास त्याच्याकडे पाठविलें तर मृत मनुष्यास पुनः

आयुष्य मिळाल्याइतका त्याला आनंद होतो. दरिद्री माणसानें अलोट संपत्ति पाहावी किंवा अंधळ्याला दृष्टि मिळावी किंवा भिकाऱ्याला इंद्रपद प्राप्त व्हावें, त्याप्रमाणें त्यास गुरुकुळींच्या नांवानें अत्यंत थोर सुख होतें." (ज्ञा., १३, ३६९–८३.) अंतःकरणांत तो श्रीगुरुमूर्तीचें अत्यंत प्रेमळपणें ध्यान करतो. आपल्या शुद्ध हृदयाच्या आवारांत, आराध्य–चैतन्याच्या पोकळींत गुरुदेवांस तो ध्रुव ताऱ्याप्रमाणें स्थिरपणें बसवितो. परमानंदाच्या देवळांत श्रीगुरुलिंगावर तो ध्यानामृताचा अभिषेक करतो. बोधाचा सूर्य उगवल्यावर सद्भावांची अनंत सुंदर फुलें आपल्या बुद्धिरूपी परडींत भरून तो श्रीगुरुमूर्तीस त्यांची लाखोली वाहतो. रोज तीनहि पवित्र काळीं तो जीवरूप धूप जाळतो व ज्ञानदीपानें श्रीगुरूस निरंतर ओंवाळतो. किंबहुना श्रीगुरूस देव करून आपण त्याचा पुजारी होतो." (ज्ञा., १३, ३८५–९०.) किंवा एकादे वेळीं तो गुरूस आपल्या भावबळानें आई मानून व तिच्यापासून मिळालेलें नामामृत पिऊन गुरुमाउलीच्या मांडीवर आनंदानें लोळतो. किंवा चैतन्यवृक्षाखालीं गुरु ही कामधेनु असून, आपण तिचें वांसरूं आहों असें तो मानतो. एकादे वेळीं गुरुकृपेच्या व गुरुप्रेमाच्या पाण्यांत स्वच्छंदानें पोहणारी मासोळी आपण आहों अशी कल्पना तो करतो. आपण एक सेवावृत्तीचें लहान रोपडें असून गुरुकृपामृताच्या पाण्यानें वाढत आहों असा संकल्प तो मनांत आणतो किंवा आपण पंख व चोंच नसलेलें पिल्लूं बनून व गुरूस पक्षिणी मानून तिच्या चोंचींतून तो चारा घेतो." (ज्ञा., १३, ३९६–४०३.) गुरूचें दास्य करण्याची शिष्यास इतकी मोठी हौस असावी कीं त्याचें कौतुक वाटून श्रीगुरूंनीं प्रसन्न होऊन त्याला वाटेल तो वर मागण्यास सांगावें व त्यानेंहि लगेच "देवा, मला स्वतःच तुझा सर्व परिवार व उपकरणीं होऊन सर्व तऱ्हेनें तुझी सेवा करूं दे" अशी विनंति करावी ! (ज्ञा., १३, ४०४–८.) देह आहे तोंपर्यंत याप्रमाणें सेवा करावी व देहाचा अंत झाल्यावरहि अशी बुद्धि बाळगावी कीं, "माझ्या श्रीगुरूंचे चरण जेथें उभे असतील त्या ठिकाणीं माझ्या शरीराची माती मिळवीन. माझा स्वामी कौतुकानें ज्या पाण्यास स्पर्श करीत असेल, तेथें माझ्या शरीरांतील पाण्याच्या अंशाचा लय करीन. त्याच्याभोंवतीं ओंवाळल्या जाणाऱ्या व उजळणाऱ्या दिव्यांत माझी दीप्ति मिसळून टाकीन. माझ्या प्राणांचें

श्रीगुरूची सेवा करणाऱ्या पंख्यांत व चवरीमध्यें मी रूपांतर करीन. माझ्या हृदयांतील आकाश, माझे स्वामी आपल्या परिवारासह ज्या आकाशांत असतील त्या आकाशांत मिळवून टाकीन. (ज्ञा., १३, ४३१–३६.) तो गुरुदास्यानें कृश व गुरुप्रेमानें पुष्ट होतो व स्वतः गुरु–आज्ञेचें एकमेव स्थान बनतो. तो गुरूच्या उच्च कुळामुळें आपणास सुकुलीन व गुरुबंधूंच्या थोर कृत्यांमुळें आपणास सज्जन मानतो. गुरूची सतत सेवा हेंच त्याचें व्यसन. गुरुसंप्रदायाचे नियम हेच त्याचे वर्णाश्रमधर्म. गुरूच त्याचें क्षेत्र, गुरूच त्याची देवता, गुरूच माता व पिता. गुरूनें दिलेला मंत्रच त्याच्या मुखांतून येतो. गुरुवाक्य नाहीं असें पुस्तक तो हातींहि धरीत नाहीं. गुरुचरणाचा स्पर्श झालेलें पाणी कसेंहि असलें तरी तें त्रैलोक्यांतील सर्व तीर्थांपेक्षां त्यास श्रेष्ठ वाटतें. अकस्मात् गुरूचें उच्छिष्ट त्यास लाभलें, तर त्यापुढें समाधि–सुखहि त्यास तुच्छ वाटतें ! कैवल्य-सुख आपणास मिळावें म्हणून गुरु चालत असतां त्यांच्या पायधुळीचे परमाणू तो आपल्या शिरावर उधळतो. त्याच्या गुरुभक्तीला सीमाच नाहीं. तो आत्म-ज्ञानाचें निधान होऊन राहतो व त्याच्यामुळें ज्ञानास शोभा येते. वस्तुतः तो देव बनतो व ज्ञान त्याचा भक्त बनतें. "वर वर्णन केलेली गुरुसेवा आपल्याहि हातून घडावी अशी माझ्या जीवाचीहि तीव्र इच्छा असल्यामुळें विषयांतर करून मीं येवढा विस्तार केला" असें ज्ञानेश्वर म्हणतात. " मी लुळापांगळा न झाल्यामुळें भजन करण्यास असमर्थ नाहीं, हें माझें केवढें भाग्य ! मी अंधळा किंवा लंगडा किंवा मुका नाहीं हें माझें सुदैव होय. मी आळशी नाहीं हेंहि भाग्यच होय. नाहीं तर गुरुसेवेशिवाय मी व्यर्थच पोसला गेलों असतों. माझ्या अंतःकरणांत गुरूविषयीं खरें प्रेम आहे हेंहि भाग्याचें होय. या कारणांकरतांच व गुरूची पारमार्थिक सेवा घडावी म्हणूनच मी आपलें शरीर पोषीत आहें," असें ज्ञानेश्वर म्हणतात. (ज्ञा., १३, ४४२–४५९.)

### शुचित्व

यानंतर पावित्र्य या सद्गुणाचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं दिलें आहे : कापरा-प्रमाणें अंतर्बाह्य निर्मळ चकचकीत असणें किंवा रत्नाचें स्वरूप जसें आंत-

बाहेर सारखेंच शुद्ध असतें, तसें असणें म्हणजे शुचित्व होय. पवित्र मनुष्य सूर्याप्रमाणें अंतर्बाह्य शुद्ध असतो. तो पवित्र आचरणानें शरीर शुद्ध ठेवता व आंतून ज्ञानानें उजळलेला असतो. याप्रमाणें दोनहि प्रकारें तो शुद्ध असतो. अंतर शुद्ध नसतां बाहेर चांगलीं कर्में करणें म्हणजे मृताला शृंगारणें किंवा गाढवाला तीर्थस्नान घालणें किंवा कडू दुध्यास वरून गुळानें माखणें म्हणजेच खऱ्या शुचित्वाची विटंबना होय. ओस पडलेल्या घरीं तोरण बांधण्याप्रमाणें किंवा उपाशी असलेल्याचें शरीर अन्नानें लिंपण्याप्रमाणें किंवा विधवेनें आपल्या कपाळावर कुंकू लावण्याप्रमाणें हें निरर्थक आहे. मुलाम्याचा कळस बाहेरून कितीहि झळाळत असला तरी आंतून पोकळच असतो. मग तो वरील झगझगाट काय जाळावयाचा ? ज्याच्या आंत शेण आहे असें बाहेरून रंगविलेलें चित्र घेऊन काय करावयाचें ? नुसतें वरवर चांगलीं कर्में केल्यानें खरें शुचित्व कसें येईल ? मदिरेचा घडा गंगेच्या पाण्यांत बुडविल्यानें पवित्र होईल काय ? म्हणून अंतरीं ज्ञान व्हावें म्हणजे बाह्य चांगलें प्राप्त होतें. बाह्यभाग कर्मानें चांगला धुतला व अंतरींचा कलंक ज्ञानानें फिटला, तरच अंतर्बाह्य शुद्ध होऊन तो मूर्तिमंत शुचित्व बनतो व त्याच्या अंतःकरणांतील शुद्ध भाव स्फटिकगृहांतील दीपाप्रमाणें स्पष्टपणें बाहेर फांकतात. असा मनुष्य बाह्यतः इंद्रिय–विषयांनीं मळला वा विषयांवर लोळला तरीहि विकाराच्या विटाळानें तो मलिन होत नाहीं. एकाद्या मनुष्यास वाटेवर अकस्मात् महार भेटले तरी त्यामुळें तो स्वतः कांहीं विटाळत नाहीं; किंवा एकच स्त्री पतीस व पुत्रास आलिंगीत असली, तरी पुत्रास आलिंगितांना तिला कामवासना शिवत नाहीं; पाण्यांत हिरा भिजत नाहीं, आधणांत वाळू शिजत नाहीं; त्याप्रमाणेंच विकल्पसमूहानें त्याचें मन विटाळत नाहीं. याचेंच नांव पूर्ण पावित्र्य व तें जेथें असतें तेथेंच ज्ञान वसतें. (ज्ञा., १३, ४६२–४८४.)

### स्थैर्य

मन मुळींच चळूं न देणें म्हणजे स्थिरता होय. स्थिर पुरुषाचें शरीर बाह्यतः आपल्या परीनें हिंडत असलें, तरी त्याच्या मनाची बैठक मोडत नाहीं.

लोभी मनुष्य दूर देशीं गेला तरी त्याचा जीव त्याच्या धनाजवळच राहतो, त्याप्रमाणें स्थितप्रज्ञ मनुष्याचा देह चालला तरी त्याचें चित्त चळत नाहीं. ढग हलले तरी त्यांबरोबर आकाश हलत नाहीं; इतर ग्रह व नक्षत्रें यांबरोबर ध्रुव तारा फिरत नाहीं; वाटसरू लोकांबरोबर रस्ता चालत नाहीं; त्याप्रमाणें हे धनुर्धरा, स्थिर मनुष्य चलनवलनात्मक पंचमहाभूतांमध्यें सांपडला असला तरीहि त्याचें मन चळत नाहीं. वादळी वाऱ्यानें पृथ्वी ढळत नाहीं, त्याप्रमाणें उपद्रवांच्या उसळीनें त्याचें मन वाहून जात नाहीं. दारिद्र्यानें तो तापत नाहीं, भयानें वा शोकानें कांपत नाहीं व देहास मृत्यु आला तरी तो भीत नाहीं. आर्ति व आशा यांच्या भरानें किंवा म्हातारपण व आजार यांच्या गर्जनेनें त्याचें सरळ असलेलें चित्त कधींहि पाठमोरें होत नाहीं. लोक त्याची नाहक निंदा करोत, त्याचें जीवित धोक्यांत असो किंवा काम, लोभ व अपमान यांनीं तो त्रस्त झालेला असो, त्याचें मन कोणत्याच परिस्थितींत एक केसभरहि ढळत नाहीं. आकाश तुटून पडो वा पृथ्वी विरून जावो, त्याची चित्तवृत्ति मुळींच चळत नाहीं. हत्तीला फुलांनीं मारलें असतांहि तो जशी त्याची मुळींच फिकीर करीत नाहीं, त्याप्रमाणें दुर्वाक्य-शल्यांनीं ताडिलें, तरी तो आपलें मन मुळींच गजबजूं देत नाहीं. (ज्ञा., १३, ४८५-९८.)

## आत्म-विनिग्रह

इंद्रियांच्या आज्ञा मनानें न मानणें म्हणजेच आत्मसंयम होय. " पिशाच्च आपल्या झाडाला सोडीत नाहीं किंवा योद्धा आपलें हत्यार सोडीत नाहीं किंवा लोभी आपलें भांडार कोणावर विसंबवीत नाहीं किंवा आपल्या एकुलत्या बाळाला माता सोडीत नाहीं किंवा मधमाशी मध-लुब्धता टाकत नाहीं, त्याप्रमाणें तो आपलें अंतःकरण जतन करतो व इंद्रियांच्या दारीं देखील उभा राहत नाहीं. काम-बागुलबुवा ऐकेल, आशा-डाकीण पाहील, म्हणून तो जिवास फार जपतो. दांडगा पति आपल्या व्यभिचारिणी पत्नीस बाहेर जाऊं देत नाहीं, त्याप्रमाणें तो आपल्या प्रकृतीवर टेहळणी करीत असतो. मनाच्या महाद्वारावर व प्रत्याहाराच्या चौकीवर तो यम-दमांचा जागता पहारा ठेवतो. आधार, नाभि व कंठ

या तीन चक्रांचे ठिकाणीं तो बंधत्रयाची गस्त घालतो. इडा व पिंगळा यांच्या संपुटांत तो मन कोंडून ठेवतो. समाधीच्या बिछान्याजवळ तो ध्यानास बांधून घालतो व चित्त–चैतन्यांचा समरस होऊं देतो." (ज्ञा., १३, ५०२–२०.)

## वैराग्य

ओकलेल्या अन्नाविषयीं रसनेला इच्छा होत नाहीं किंवा मृतास आलिंगिण्यासाठीं बाहू पसरत नाहींत, त्याप्रमाणें विरक्त मनुष्य इंद्रियसुखाविषयीं पूर्ण निरिच्छ असतो. विष खाणें आवडत नाहीं, जळत्या घरांत जाववत नाहीं, वाघाच्या गुहेंत वस्ती करवत नाहीं, उकळणाऱ्या लोखंडाच्या काहिलींत उडी घेववत नाहीं किंवा अजगराची उशी करवत नाहीं, त्याप्रमाणें त्याला विषयवार्ताच आवडत नाहीं. त्याला कोणत्याहि वस्तूबद्दल तीव्र लालसा नसते. त्याचें शरीर रोडकें असतें व त्यास शान्ति व संयम यांमध्येंच आनंद वाटतो. तो तप व उपवास करण्यांत आपलें आयुष्य घालवितो. गजबजलेल्या शहरांत जाणें सुद्धां त्यास मरणप्राय वाटतें. त्यास योगाभ्यासाची हांव असते. एकान्तासाठीं तो अरण्याकडे धांव घेतो व समाजाचें नांवहि त्यास सहन होत नाहीं. ऐहिक भोग त्यास बाणांच्या अंथरुणावर निजण्याप्रमाणें अथवा पुवाच्या चिखलांत लोळण्याप्रमाणें वाटतात आणि स्वर्गसुख तर तो कुत्र्याच्या कुजलेल्या मांसाप्रमाणें मानतो. इंद्रियजन्य सर्व विषयांविषयीं जेव्हां असें पूर्ण वैराग्य प्राप्त होतें, तेव्हांच तो आत्मप्राप्तीचा व ब्रह्मानंदाचा अनुभव चाखण्यास योग्य होतो." (ज्ञा., १३, ५१४–२३.)

## अनहंकार

वासनासक्त व्यसनी मनुष्याप्रमाणें इष्ट कर्मे करूनहि कर्तेपणाचा अहंकार न बाळगणें म्हणजेच अनहंकार होय. अनहंकारी पुरुष आपल्या वर्णाश्रमांस पोषक अशीं नित्यनैमित्तिक कर्मे आचरण्यास कधींच चुकत नाहीं. तथापि कर्म मीं केलें व हें माझ्यामुळें सिद्धीस गेलें ही भावना तो आपल्या अंतःकरणांत ठेवीत नाहीं. वायु सहज सर्वत्र वाहतो व सूर्य कोणतेंहि उद्दिष्ट मनांत न

धरतां उगवतो. अनुभूति जशी सहज येते, अमुक एका ठिकाणीं जावयाचें असा विचारहि मनांत न धरतां गंगा जशी वाहते, त्याप्रमाणें तो अहंकाराशिवाय आपलीं सर्व कर्में करतो. झाडांस योग्य वेळीं फळें येतात, परंतु झाडांस त्याची जाणीव नसते, त्याप्रमाणें सर्व कर्माबद्दल त्याची वृत्ति असते. एकेरी हारांतील दोरी काढावी त्याप्रमाणें त्याचे विचार, उच्चार आणि आचार यांतील अहंभाव नष्ट झालेला असतो. आकाशांतील ढग ज्याप्रमाणें एकमेकांपासून अलिप्त असतात, त्याप्रमाणें त्याचीं कर्में देहापासून अलिप्त असतात. दारूनें झिंगलेल्यास आपण कोणतें वस्त्र नेसलों आहों याचें ज्ञान नसतें किंवा भिंतीवरील चित्रास आपल्या हातीं कोणतें शस्त्र दिलें आहे हें माहीत नसतें किंवा आपल्या पाठीवर कोणत्या शास्त्राचीं पुस्तकें लादलीं आहेत हें बैलास कळत नाहीं, त्याप्रमाणें त्याला आपण देहांत आहों ही जाणीवच नसते. हीच खरी निरहंकारिता होय. (ज्ञा, १३, ५२५-३४.)

## दुःखवाद

जगांत दुःख फार भरलें आहे असें मानणें हें कांहीं वेळां परमार्थास अवश्यक असतें असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें आहे. जन्म, मृत्यु, म्हातारपण व रोग यांच्यापासून होणाऱ्या दुःखांचा प्रत्यक्ष भोग भोगण्यापूर्वीं दुरूनच विचार करावा. हा देह म्हणजे पुवाचा खड्डा असून तो मूत्र–रंध्रांतून निघाला आहे, कुचस्वादानें पोसला आहे. म्हणून त्याचा कंटाळा यावा व मृत्यु कल्पांतीं का येईना, परंतु तो येण्यापूर्वींच शक्य तितक्या लवकर सावध होऊन पुनः असा जन्म न येईल असें वागावें नदीचें पाणी फार खोल आहे हें कळतांच पोहणारा पोहावयास पडण्यापूर्वीं व या तीरावरच कास कसत नाहीं काय? उद्यांच्या मुक्कामाचा वाटाड्या दरोडेखोर आहे हें समजल्यावर वाटसरू रात्रभर जागा राहत नाहीं काय? मरण येण्यापूर्वीं मनुष्य औषध घेत नाहीं काय? घर जळूं लागल्यावर विहीर खणावयास लागून काय उपयोग? जबरदस्तांशीं हाडवैर पडल्यावर मनुष्य जसा रात्रंदिवस आपली तलवार परजून ठेवतो किंवा उपवर झालेली मुलगी विवाहित होणार हें जसें निश्चित किंवा संन्यास घेणार असें ज्यानें जाहीर केलें असेल त्यानें

जसा संन्यास घेतलाच पाहिजे, त्याप्रमाणें प्रत्यक्ष मरण येण्यापूर्वींच प्रत्येकानें त्याची विवंचना केली पाहिजे. जन्मास जन्मानें व मृत्यूस मृत्यूनें मारून आपण आत्मरूप राहावें. तारुण्याच्या भरांत असतांच म्हातारपणाचा विचार करावा : आज माझें शरीर पुष्ट आहे, परंतु उद्यां तें वाळलेल्या भाजीप्रमाणें सुकून जाईल; आज माझे डोळे पद्मदलांशीं स्पर्धा करीत आहेत, पण तेच उद्यां पिकलेल्या पडवळाप्रमाणें होतील; माझीं मलमूत्र-द्वारें फुटकीं होतील व माझ्या मृत्यु-साठीं इतर लोक नवस करतील; माझ्या अंगीं मृत्यूचा पराधीनपणा येईल, सर्व सोयऱ्यांना माझा कंटाळा येईल व जग मला पाहून थुंकील. माझ्या खोकण्यानें शेजाऱ्यांना जागरण होऊन 'हा म्हातारा मरत कां नाहीं ? हा फार लोकांना दमवील' असें ते तिरस्कारानें म्हणूं लागतील ! या सर्व वार्धक्याच्या सूचनांचा तरुणपणींच विचार करावा म्हणजे आयुष्यास मन विटेल. कान बहिरे झाले नाहींत तोंच चांगलें सर्व ऐकावें; पंगूपणा आला नाहीं तोंच जाणें योग्य असेल तेथें जावें; दृष्टि आहे तोंच जें चांगलें पाहावयाचें असेल तें पाहून घ्यावें; वाचा बंद झाली नाहीं तोंच चांगलें बोलून घ्यावें; हात लुळे पडले नाहींत, तोंच सर्व दानधर्म करून टाकावे. शरीराची अशी विकल स्थिति झाली असतां मन वेडें होईल, म्हणून आधींच आत्मज्ञानाचा चांगला विचार करावा. चोरांनीं घर व संपत्ति लुटलीं नाहींत, तोंपर्यंतच आपल्या मालमत्तेची व्यवस्था करून टाकावी; किंवा दिवा आहे तोंच घरांतील झांकपाक करून सामान नीटनेटकें लावावें; त्या-प्रमाणें वार्धक्य आलें नाहीं, तोंच आपल्या जीवनाची सर्व व्यवस्था उत्तम रीतीनें लावावी. मार्गांतील डोंगर व दऱ्या यांतून एकादा वाटसरू जपून गेला नाहीं किंवा संध्याकाळीं पक्षी आपल्या घरट्यांत परत जाऊं लागले या गोष्टी-कडे त्यानें दुर्लक्ष केलें, तर त्याला चोर लुटतात. नाना रोगांनीं शरीर ग्रस्त झालें नाहीं तोंच आरोग्याचा उपाय करावा. शहाणा मनुष्य ज्याप्रमाणें सापाच्या तोंडांतून पडलेला लाडू टाकून देतो, त्याप्रमाणें ज्याच्यामुळें वियोग, आपत्ति व शोक यांचें दुःख होतें त्याचा स्नेह सोडून मनुष्यानें उदास राहावें." (ज्ञा., १३, ५३६-९०.)

## अनासक्ति व एकान्तप्रियता

"पाहुणा दुसऱ्याच्या घरीं राहतो त्याप्रमाणें अनासक्त पुरुष आपल्या देहाविषयीं उदास असतो. रस्त्यावरून जातांना अकस्मात् झाडाची सांवली मिळाली असतां एकाद्याला तिच्यविषयीं जेवढी आस्था वाटते, तेवढीच त्यास आपल्या घराविषयीं वाटते. आपल्याबरोबरच नेहमीं असणाऱ्या सांवलीप्रमाणें आपल्या पत्नीविषयीं तो लोलुप नसतो. मुलें म्हणजे सहज एकत्र आलेल्या वाटसरांप्रमाणें किंवा यदृच्छया झाडाच्या छायेंत बसलेल्या गुरांप्रमाणें आहेत असें मानावें. वाट दाखविणारी पाटी ज्याप्रमाणें वाट चालत नाहीं, त्याप्रमाणें अनासक्त पुरुष संपत्तीच्या बाबतींत अलिप्त असतो." (ज्ञा., १३, ५९४–९८.) त्यास एकांत आवडतो. पवित्र तीर्थें, नदीतीर, सुंदर तपोवनें व गुहा या ठिकाणीं परमार्थासाठीं राहणें त्यास फार आवडतें. पर्वताच्या बाजूस असलेल्या कुहरांत व जवळच्या सरोवरावर तो प्रेमानें राहतो. त्यास गजबजलेल्या शहरास कधींहि येऊं नये असें वाटतें. एकान्तावर ज्याची प्रीति व जनसमुदायाबद्दल ज्यास खंती असते असा मनुष्य म्हणजे ज्ञानच मनुष्यरूपानें आलें आहे असें जाणावें. (ज्ञा., १३, ६१२–१४.)

## अनन्य भक्ति

या सर्व गुणांवर शिखर चढविल्याप्रमाणें त्याच्या अंगीं परमेश्वराविषयीं अनन्य भक्ति असावी. देवापेक्षां चांगलें दुसरें कांहींच नाहीं असा त्यानें मनाचा निश्चय करावा. त्यानें काया-वाचा-मनानें सर्वस्वीं देवाचें ध्यान करावें. "त्यानें अगदीं माझ्या सन्निध यावें व माझ्याबरोबर बसावें. आपल्या पतीकडे जाण्यास स्त्रीस ज्याप्रमाणें मुळींच संकोच वाटत नाहीं, त्याप्रमाणें मजकडे येण्यास त्यास संकोच वाटूं नये. किंवा गंगाजळ ज्याप्रमाणें समुद्रांत मिळून मिळतच राहतें, त्याप्रमाणें तो मी होऊन मला सर्वस्वीं भजत राहतो. याप्रमाणें जो अनन्यपणें मला वरतो तो मूर्तिमंत ज्ञानच होय!" (ज्ञा., १३, ६०४–११.) आणि ज्ञान म्हणजे काय? एक परमात्माच तेवढा आहे व दुसरें कांहींच नाहीं, हें अनुभवणें म्हणजेच ज्ञान. भवस्वर्गादिकांचें ज्ञान म्हणजे

वस्तुतः अज्ञान होय. फक्त एक परमात्मा खरा व बाकी सर्व भ्रांति, असा ज्याच्या मनाचा निश्चय झाला त्यासच खरें ज्ञान प्राप्त झालें. याप्रमाणें अध्यात्मज्ञानाचा निश्चय ज्याच्या अंगीं बाणला तो आकाशांतील ध्रुव ताऱ्याप्रमाणें अढळ व स्थिर राहतो. इतर ज्ञानाचा काय उपयोग ? तें अंधळ्याच्या हातांतील दिव्याप्रमाणें निरुपयोगी नाहीं काय ? ध्यानाच्या प्रकाशानें ज्यास अंतिम ध्येय प्राप्त होतें तो परतत्त्व जणूं आपल्या तळहातावरच धरतो. (ज्ञा., १३, ६१६–३२.)

### अज्ञान–लक्षण

सॉक्रेटिसाप्रमाणें सद्गुण व ज्ञान यांचें ऐक्य व भगवद्गीतेप्रमाणें ज्ञान म्हणजे वर वर्णिलेले सद्गुण, हें मत ज्ञानेश्वरांनीं कसें प्रतिपादिलें आहे हें आपण पाहिलें. दुर्गुणांविषयींहि त्यांनीं असेंच ज्ञानप्रधान मत मांडलें आहे. अज्ञान म्हणजे ज्ञानाचा अभाव म्हणजेच अर्थात् वर सांगितलेल्या सर्व सद्गुणांचा अभाव होय. "अज्ञानं यदतोऽन्यथा" या भगवद्गीतेंतील सूचक विधानावरून ज्ञानेश्वरांनीं कोणत्या गुणांचा अभाव म्हणजे अज्ञान याचें विस्तृत विवेचन केलें आहे. वर दिलेल्या प्रत्येक सद्गुणास विरोधार्थक दुर्गुण असून त्या प्रत्येकाचीं लक्षणें ज्ञानेश्वरांनीं सविस्तर दिलीं आहेत. दिवस सरला कीं रात्र येते, त्याप्रमाणें ज्ञान संपलें कीं अज्ञानाचें साम्राज्य सुरू होतें. त्या अज्ञानाचीं कांहीं लक्षणें आतां आम्ही सांगतों:—"अज्ञानी मनुष्य दुसऱ्यांनीं दिलेल्या मानावर जगतो; तो मानाची वाट पाहतो व सत्कारानें त्याला संतोष वाटतो; आपलें महत्त्व कमी होईल म्हणून जो गर्वाच्या पर्वतशिखरावरून खालीं येतच नाहीं, त्याच्या अंगीं पूर्ण अज्ञान भरलेलें आहे असें समजावें. देवळाच्या शिखरावर केरसुणी उभी करावी, त्याप्रमाणें तो शब्दांच्या मोठ्या वृक्षावर आपल्याच गुणांची कमान उभी करतो, आपल्या विद्येचें प्रदर्शन मांडतो व आपल्या सुकृताचा डांगोरा पिटतो. तो जें कांहीं करतो, तें आपल्या प्रसिद्धीसाठींच करतो. अरण्यांत वणवा पेटला म्हणजे तो जसा सर्व स्थावर–जंगमास जाळतो, त्याप्रमाणें त्याच्या वर्तनानें सर्व जगास दुःख होतें. तो सहज थट्टेनें जें बोलतो

तें बर्चीपेक्षांहि तीक्ष्ण व मर्मभेदक आणि विषाहूनहि मारक असतें. वावटळींत सांपडलेली धूळ ज्याप्रमाणें उंच आकाशांत चढते त्याप्रमाणें तो स्तुतीच्या आनंदानें चढतो. चिखल थेंबभर पाण्यानें विरतो व वाऱ्याच्या झुळुकीनें सुकतो, त्याप्रमाणें थोडीशी निंदा ऐकली तरी तो आपलें कपाळ धरून बसतो. तो मनानें आंतल्या गांठीचा असतो व त्याच्या बडबडीस निर्बंध नसतो. तो समक्ष एकास संमति दाखवितो व मागें दुसऱ्यासच मदत करतो. पारध्यानें हरणापुढें ठेवलेल्या गवताप्रमाणें, शेवाळानें भरलेल्या दगडाप्रमाणें किंवा पिकलेल्या निंबोण्यांप्रमाणें त्याची बाह्य कृति वरपांगी व दुष्ट असते. त्यास गुरुकुळाची लाज वाटते; गुरुभक्तीस तो त्रासतो; गुरुपासून विद्या शिकून तो त्याच्याशीं मस्तीनें वागतो. तो शरीरानें व कृतीनें ढिला असतो व अरण्यांतील निकामी विहिरींत ज्याप्रमाणें वर कांटे व आंत हाडें असतात, त्याप्रमाणें त्याचें मन संशयानें व विकारानें भरलेलें व अंतर्बाह्य घाणेरडें असतें. भुकेला कुत्रा ज्याप्रमाणें पोटासाठीं उघडें-झांकलें म्हणत नाहीं, त्याप्रमाणें तो द्रव्याच्या बाबतींत आपलें व दुसऱ्याचें जाणत नाहीं. ग्रामसिंहास ज्याप्रमाणें भक्ष्याभक्ष्याचा विचार नसतो, त्याप्रमाणें दुर्गुणी मनुष्य स्त्रियांविषयीं कांहींहि विचार करीत नाहीं. नित्यनैमित्तिक कर्माची वेळ चुकली तर त्यास दुःख होत नाहीं. पाय ठेवल्याबरोबर डबक्यांतलें पाणी जसें गढूळ होतें, त्याप्रमाणें भीतीच्या नुसत्या नांवानेंहि त्याचें मन गडबडतें. पुरांत पडलेल्या भोपळ्याप्रमाणें वासनांच्या प्रवाहाबरोबर त्याचें मन वाहवतें. अशा मनुष्याच्या ठायीं गाढ अज्ञान वसतें; कारण, चांचल्यांत तो माकडाचा भाऊ असतो. मोकाट सोडलेल्या बैलाप्रमाणें, अफाट वादळाप्रमाणें, माजलेल्या हत्तीप्रमाणें किंवा डोंगरावरील वणव्याप्रमाणें त्याचें मन विषयांत भटकत राहतें. तो इंद्रियसुखांत नखाशिखांत बुडलेला असतो! त्याला कामक्रीडेचें व्यसनच असतें. विरक्त मनुष्याचें तोंड पाहून तो सचैल स्नान करतो. गाढवास जवळ येऊं न देतां गाढवी उड्या मारते व लाथांनीं त्याचें नाक फोडते, तरीहि गाढव माघार घेत नाहीं, त्याप्रमाणें इंद्रियसुखासाठीं विषयांच्या जळत्या आगींत तो उडी घेतो व व्यसनांचे दागिने अंगावर मिरवितो. मृगजळामागें लागून हरणाचें डोकें फुटलें तरी हरण धांवतच राहतें, त्याप्रमाणें जन्मापासून मृत्यु येईपर्यंत

इंद्रियसुखांमागें तो धांवतच असतो. त्यांत त्यास अतिशय त्रास झाला तरीं त्याचा त्रास न मानतां उलट तो त्यांवर जास्तच प्रेम करतो. बाळपणीं तो आईवर प्रेम करतो, तारुण्यांत स्त्रीमांसानें भुलून जातो व स्त्रीसंभोगांत म्हातारपण आलें तरी तोच प्रेमभाव तो आपल्या मुलांवर केंद्रित करतो. या सर्व बाबतींत तो 'देहच आत्मा' असें मानून त्याप्रमाणें वागतो. देव अंगांत आणणारा मनुष्य ज्याप्रमाणें डोक्यावर फुलें ठेवतांच देव अंगांत शिरला म्हणून घुमूं लागतो, त्याप्रमाणें तो विद्या व तारुण्य यांच्या अभिमानानें उताणा चालूं लागतो. माझ्यापेक्षां थोर व प्रसिद्ध कोणीहि नाहीं, मी सर्वज्ञ आहें, असा गर्व बाळगून तो गाल फुगवून बोलूं लागतो. दिवा ज्याप्रमाणें वात खातो, तेल जाळतो व फक्त काजळी मात्र मागें राहते, त्याप्रमाणें तो आपले सर्व गुण आणि स्नेह जाळतो व केवळ काजळीप्रमाणें राहतो. मिणमिण दिव्याची ज्योत ज्याप्रमाणें किंचित् पाणी टाकलें तर तडतडते व थोडा वारा लागला तर विझते, पण लहानशी काडी मिळाली तरी पेट घेते, अगदीं थोडासा प्रकाश देते व तेवढीच ऊब धरते, त्याप्रमाणें थोडयाशा ज्ञानानें देखील तो आपणास सुविद्य मानतो. अंत्यजास सिंहासनावर बसवावें किंवा अजगरानें वाळलेलें लांकूड गिळावें, त्याप्रमाणें तो गर्वानें फुगलेला दिसतो. तो लाटण्याप्रमाणें लवत नाहीं, दगडाप्रमाणें द्रवत नाहीं व फुरसें ज्याप्रमाणें गरुडयासहि दाद नाहीं, त्याप्रमाणें तो कोणासहि बधत नाहीं. त्याचा जीवनावर इतका भयंकर विश्वास असतो कीं या जगांत मृत्यु म्हणून कांहीं वस्तु आहे असें त्याचें मन मानतच नाहीं. उथळ पाण्यांतील माशास ज्याप्रमाणें हें पाणी आटेल म्हणून आपण खोल पाणी असलेल्या डोहांत जावें असें वाटत नाहीं, त्याप्रमाणें मृत्यूच या जीवनरूपानें आला आहे हें राजविलासांमुळें त्यास उमजतच नाहीं! वेश्येने आपलें सर्वस्व देणें म्हणजेच याची नागवणूक होय; सावासारख्या चोराची मैत्री म्हणजे आपलें मरण व मातीच्या चित्रास स्नान घालणें म्हणजे त्याचा नाश ही गोष्ट त्या बापड्यास कळत नाहीं. फांशीं जाणारा मनुष्य सुळाकडे जाऊं लागला म्हणजे प्रत्येक पावलागणिक तो मृत्यूजवळ जातो, त्याप्रमाण जसजशी देहाची वाढ होते व सुख वाढतें तसतसा मृत्यु जीवास जिंकतो व

पाण्यांत मीठ विरघळत जातें त्याप्रमाणें आयुष्य कमी कमी होत जातें. कड्यावरून लोटलेला गाडा किंवा पर्वतशिखरावरून सुटलेला धोंडा निश्चितपणें खालीं येणार त्याप्रमाणें आपणास पुढें वार्धक्य निश्चित येणार हे त्यास दिसत नाहीं. आडरानांतील ओढ्याचें पाणी मातते किंवा दोन झुंजणारे रेडे मदानें वेडे होतात, त्याप्रमाणें त्याच्या अंगांत तारुण्याचें वेड शिरलेलें असतें. वाघाच्या अरण्यांत चरावयास जाऊन एकदां अकस्मात् जिवंत परत आलेल्या बैलास पुनः तेथें जाण्याची इच्छा व्हावी त्याप्रमाणें सर्पाच्या तावडींतून चुकून एकादे वेळीं संपत्ति आणली तरी तेथें साप आहे व ही संपत्ति लवकरच नाहींशी होऊन आपल्यावर तावडतोब संकट ओढवेल ह्याची कल्पना त्यास येत नाहीं. या क्षणिक संपत्तीच्या जोरावर व तारुण्याच्या भरांत तो सेव्यासेव्य सारखेंच मानतो, जाऊं नये तेथें जातो, पाहूं नये तें पाहतो, धरूं नये त्याचा संग धरतो, खाऊं नये तें खातो, ऐकूं नये तें ऐकतो, बोलूं नये तें बडबडतो व करूं नये तें करतो. नवीन सुवासिक कमळांच्या केसरांत भ्रमरी गुंतते, त्याप्रमाणें त्याची प्रीति घरीं गुंतलेली असते. साखरेच्या राशीवर बसलेली माशी उठत नाहीं, त्याप्रमाणें त्याचें मन स्त्रीवर आसक्त असतें. मन स्त्रीवश झाल्यामुळें त्यास आपलें हित कळत नाहीं, त्यास लाज वाटत नाहीं व दुसऱ्याच्या टीककडे तो लक्ष देत नाहीं. त्याचीं सर्व इंद्रियें स्त्रीवश झाल्यानें तो गणिकेच्या नादीं लागतो. गारुडी नाचवील तसें माकड नाचतें, त्याप्रमाणें तिच्या छंदानें तो नाचतो. एकनिष्ठ भक्त आपल्या कुलदेवतेची पूजा करतो, त्याप्रमाणें तो एकाग्र चित्तानें आपल्या स्त्रीची उपासना करतो. तिच्याकडे कोणी वांकड्या नजरेनें पाहिलें किंवा तिच्या विरुद्ध गेलें, तर प्रलय होईल असें त्याला वाटतें. देवाची भक्ति केलीच तर तो कांहीं तरी फलाशा धरून करतो व भजन केल्याबरोबर जर त्याची इच्छा सफल झाली नाहीं तर त्याचा विश्वास उडतो व देव खोटा म्हणून तो त्याची भक्ति सोडून देतो. खेडवळ कुणबटाप्रमाणें याप्रकारेंच तो एकामागून एक अनेक देवांस भजतो. ज्याची कीर्ति व भरभराट असेल अशा गुरूच्या मार्गाचा अवलंब करतो व त्यापासून मंत्र शिकतो. तो माझी मूर्ति आपल्या मर्जीप्रमाणें बनवितो व ती

घरांतील एका कोंपऱ्यांत ठेवून आपण अनेक देवदेवींच्या यात्रेस निघून जातो. खऱ्या देवाची पूजा रोज केली पाहिजे; परंतु तो विशेष कार्यासाठीं कुलदेवतेची पूजा करतो व विशेष पर्वकाळीं आणखी निराळ्या देवांची पूजा करतो. घरीं खऱ्या देवाची प्रतिष्ठापना केली असली, तरी नवस इतर देवांना करतो व श्राद्धाच्या दिवशीं पितरांची पूजा करतो. एकादशीच्या दिवशीं जितक्या भक्तीनें तो विष्णूची पूजा करतो तितक्याच भक्तीनें तो नागपंचमीच्या दिवशीं नागाची व वद्य चतुर्थीस दुर्गेची पूजा करतो. नित्यनैमित्तिक कर्में टाकून तो नवचंडी-होम करतो. रविवारीं भैरवास प्रसन्न करण्यासाठीं अन्नदान करतो, तर सोमवारीं बेलपत्रांनीं शिवलिंगाची पूजा करतो. याप्रमाणें तो एकटाच सर्व देवांची पूजा करतो. गांवाच्या वेशीच्या द्वाराजवळ उभी राहून वेश्या ज्याप्रमाणें प्रत्येक पुरुषाचें लक्ष आपल्याकडे वेधण्याचा प्रयत्न करते, त्याप्रमाणें त्याचें रोज अनेक देवांचें अखंड भजन चाललेलें असतें. अर्जुना, असा या देवापासून त्या देवाकडे सैरावैरा धांवणारा भक्त म्हणजे अज्ञानाची मूर्तीच समज. अशा मनुष्याला जनसमुदाय प्रिय वाटतो, गजबजलेलें शहर आवडतें व गप्पा मारण्यांतच आनंद वाटतो. जर खऱ्या आत्मज्ञानाच्या मार्गाविषयीं त्याच्यापुढें कोणी बोलूं लागला, तर तो अत्यंत गोंगाट व उपहास करतो व त्याचें बोलणें ऐकून घेण्यास मुळींच तयार नसतो. उपनिषदांकडे तो ढुंकूनहि पाहत नाहीं. त्यास योगशास्त्र आवडत नाहीं, अध्यात्मशास्त्रांत त्याचें मनच लागत नाहीं. परमार्थावांचून बाकी सर्व विषय त्याला आवडतात. कर्मकांड त्याला माहीत असतें, पुराणें मुखोद्गत असतात. तो म्हणेल तें खरें होईल असा तो निष्णात ज्योतिषी असतो. तो शिल्पकलेंत निपुण व पाकशास्त्रांत प्रवीण असतो, अथर्ववेदांतील जादूमंत्रांचा तो तज्ज्ञ असतो. कामशास्त्रांत तो बाकी कांहींच ठेवीत नाहीं. भारताचा अभ्यास त्यानें पुरा केलेला असतो, आगम आत्मसात् केलेले असतात. नीतिशास्त्रांतील सर्व वाद त्यास अवगत असतात, वैद्यकांत त्याची गति असते, काव्य-नाटकांत तर त्याच्या बरोबरीचा कोणीहि नसतो तो स्मृतींची चर्चा करतो, गारुड्याच्या कलेचें मर्म जाणतो, निघंटांत तर पूर्ण विशारद असतो व व्याकरणांत चोख आणि तर्कांत गाढा विद्वान् असतो. या

सर्व शास्त्रांत तो प्रवीण असून आत्मज्ञानांत तेवढा तो पूर्ण जन्मांध असतो. मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलास पाहिल्यानें मृत्यु येतो म्हणून त्यास पाहूं नये, त्याप्रमाणें अशा मनुष्याचेंहि तोंड पाहूं नये. मोराच्या अंगभर असलेल्या सर्व पिसांना डोळे असतात, परंतु एकासहि दृष्टि (पाहण्याची शक्ति) नसतें, त्याप्रमाणें एका अध्यात्मज्ञानावांचून हीं सर्व शास्त्रें व्यर्थ व अप्रमाण होत. अशा मनुष्याचा देह म्हणजे अज्ञानाचें बीज होय व अशा बीजापासून अज्ञानरूपीच वृक्ष, फुलें व फळें निर्माण होणार!" (ज्ञा., १३, ६५३-८४२)

## दैवी संपत्ति : १

वर तेराव्या अध्यायांत विस्तृतपणें दिलेले विविध सद्गुण व तद्विरोधी दुर्गुण यांचें सूक्ष्म पृथक्करणात्मक विवेचन हा ज्ञानेश्वरांचा 'अंतरंगींचे तत्त्वज्ञ' या दृष्टीनें अवर्णनीय विशेष आहे हें आपण पाहिलें. सोळाव्या अध्यायांत पुन: याच विषयाचें विवेचन निराळ्या मथळ्याखालीं आलें आहे. तेथें परंपरागत व उपजत असलेल्या अशा दोन प्रकारच्या—दैवी व आसुरी—संपत्तींचें वर्णन दिलें आहे. दैवी संपत्ति म्हणजे सद्गुणांची संपत्ति व आसुरी संपत्ति म्हणजे दुर्गुणांचा समुच्चय होय. आतां दैवी संपत्तींत कोणत्या सद्गुणांचा समावेश होतो तें पाहूं. या सर्व सद्गुण-समुच्चयांत अभयास श्रेष्ठ स्थान मिळतें. कर्माकर्मांचा अहंकार नाहींसा झाल्यामुळें संसाराची भीति सांडणें यासच निर्भयता म्हणावें. अथवा ऐक्यभावाचा इतका विस्तार व्हावा कीं त्यामुळें दुसराहि आत्मरूप होऊन भयाची वार्ता देखील देशोधडीस जावी. हेंहि एक प्रकारचें अभयच होय. पाणी मिठास बुडवावयास गेलें तर मीठच पाणी होतें, त्याप्रमाणें आपण अद्वैत झाल्यावर भयाचा ताबडतोब नाश होतो. दैवी संपत्तींतील दुसरा सद्गुण म्हणजे सत्त्वशुद्धि होय. वर्षाऋतूच्या आधीं व ग्रीष्म ऋतूनंतर गंगेचें पाणी जसें निर्मळ व स्वच्छ असतें, त्याप्रमाणें आपलें अंतःकरण ठेवणें म्हणजेच सत्त्वशुद्धि. आपला वल्लभ दूर देशीं गेल्या वेळीं विरहक्षोभानें पतिव्रतेस हानिलाभाचा विचारहि शिवत नाहीं, त्याप्रमाणें इंद्रियवर्गानें मन विचलित न होऊं देतां बुद्धि सत्स्वरूपांत आनं-

दानें लीन व एकरूप करणें म्हणजेच सत्त्वशुद्धि होय. **स्थिरता** हा ज्ञान–योगांतील तिसरा सद्गुण होय.) त्यामुळें आत्मलाभाविषयीं तीव्र इच्छा उत्पन्न होते. त्यामुळें अग्नींत निष्कामपणें आहुति द्यावी त्याप्रमाणें सगळ्या चित्त–वृत्तींचा देवासाठीं त्याग करतां येतो. कुलीन गृहस्थ ज्याप्रमाणें आपली कन्या निरपेक्षपणें सत्कुळीं जन्मलेल्या वरास देतो, त्याप्रमाणें मनुष्यानें निर्विकल्पपणें योगज्ञानांत स्थिर व्हावें. रस्त्यावरील वृक्ष ज्याप्रमाणें छाया, पत्र, पुष्प, फल हीं सर्व वाटसरूंस द्यावयास चुकत नाहीं, त्याप्रमाणें मन, धन इत्यादि आपल्या-जवळ असलेलें सर्व श्रमलेल्यांच्या उपयोगासाठीं आनंदानें देणें म्हणजे खरें **दान** होय. गढूळ पाण्यांतील गढूळपणा निवळीच्या बियांनीं काढून टाकावा, त्याप्रमाणें इंद्रियांना विषयांपासून तोडून दूर ठेवणें म्हणजेच **दम** होय. इंद्रियांवर विषयांचा ताबा चालूं नये म्हणून त्यांना एकत्र बांधून संयमाच्या स्वाधीन करावें. दाही इंद्रियें वैराग्य–अग्नीनें भरणें व श्वासोछ्वा-सागणिक देहास व्रतें आचरावयास लावणें म्हणजेच दम होय. यापुढचा सद्गुण म्हणजे **यज्ञ**. आपल्याजवळ जें सर्वांत उत्तम असेल तें विधिपूर्वक परमात्म्यास अर्पण करणें म्हणजे यज्ञ होय. ब्राह्मणानें षट्कर्में केलीं व त्यास शूद्रानें नम-स्कार केला, तर दोघांनाहि यागफल सारखेंच मिळतें. आपआपलीं कर्तव्यें योग्य प्रकारें बजावणें म्हणजेच अधिकारपरत्वें यज्ञ करण्यासारखें आहे व म्हणून यज्ञ सर्वांसच करतां येतो. मात्र फलाशेच्या विषाची बाधा तेवढी होऊं देऊं नये. चेंडू जमिनीवर आपटावयाचा तो जमिनीस हाणण्यासाठीं नव्हे, तर परत झेलण्यासाठीं. बीज जमिनींत पेरावयाचें तें तेथेंच राहूं देण्यासाठीं नव्हे, तर पीक काढण्यासाठीं. आरसा पुसून साफ करावयाचा तो आपलें प्रतिबिंब स्वच्छ दिसावें म्हणून. त्याप्रमाणें सर्व शास्त्रांचा अभ्यास केवळ त्या शास्त्रांच्या ज्ञानासाठीं करावयाचा नसून ईश्वरप्राप्तीसाठीं करावयाचा असतो. ब्राह्मणानें ब्रह्मसूत्रांचा अभ्यास करावा, दुसऱ्यांनीं स्तोत्रें म्हणावीं किंवा देवाचें नामस्मरण करावें. परमेश्वरप्राप्तीसाठीं यांपैकीं कोणत्याहि गोष्टीचा अवलंब करणें म्हणजेच **स्वाध्याय** होय. अग्नींत धूप जळतो, शुद्धीकरणानें सोन्याचें वजन कमी होतें किंवा कृष्ण पक्षांत चंद्राचा क्षय होतो, त्याप्रमाणें स्वरूप–प्राप्तीकरतां शरीराची व प्राणांची आटणी करणें यालाच **तप** म्हणतात." (ज्ञा., १६, ९८–१०८.)

**दैवी संपत्ति : २**

आतां दैवी संपत्तीच्या दुसऱ्या गुणसमुच्चयाचें वर्णन ज्ञानेश्वर करतात: "दूध जसें सर्व बालकांना सारखेंच हितकारक असतें किंवा चैतन्य जसें सर्व भूतमात्रांत सारखेंच असतें, त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांशीं मैत्री असणें म्हणजेच **आर्जव** किंवा सरळपणा होय. आणि जगाचें हित व्हावें या उद्देशानें शरीर–वाचा–मनांनीं वागणें म्हणजेच **अहिंसा** होय. **सत्य** जाईच्या कळीप्रमाणें अणकुचीदार पण मृदु व चंद्रप्रकाशाप्रमाणें शुभ्र पण शीतल असतें; किंवा रुचीला कडू मुळींच नाहीं, परंतु पाहतां क्षणींच रोगाचा नाश करणाऱ्या औषधाप्रमाणें सत्य असतें. असें औषध उपलब्ध नाहीं म्हणून सत्य निरुपमेय आहे. पाणी पर्वताचे कडे फोडतें, परंतु डोळा आंत बुडविला तरी डोळ्यास मुळींच खुपत नाहीं, त्याप्रमाणें सत्य आहे. संशय नाहींसे करण्याच्या कामीं सत्य लोखंडापेक्षां तीक्ष्ण व कठिण असतें; परंतु ऐकतांना मूर्तिमंत गोडीलाहि तें मागें सारतें. तें प्रिय असून कोणास फसवीत नाहीं व यथार्थ असून कोणास खुपत नाहीं. याउलट, पारध्याचें गाणें फार गोड असतें, परंतु तें हरणास प्राणघातक ठरतें ! कानाला मधुर, पण अर्थ पाहूं गेलें असतां जें काळीज भेदतें तें राक्षशिणीचें सुंदर गायन घेऊन काय जाळावयाचें ? सत्य हें आईच्या बोलण्याप्रमाणें बाह्यत: कडक, पण वस्तुतः फुलाप्रमाणें मृदु, निर्विकार व श्रवणमधुर असतें. **अक्रोधत्व** हा एक अंतःकरणाचा गुण आहे. दगडावर पाणी ओतलें तरी त्यास अंकुर फुटत नाहीं, सापाच्या कातेवर पाय दिला तरी ती कांहीं फणा उभारीत नाहीं, वसंत ऋतूंत देखील आकाशास फुलें येत नाहींत, रंभेच्या रूपामुळें देखील शुकामध्यें कामवासना जागृत झाली नाहीं, राखेंत कितीहि तूप ओतलें तरी अग्नि प्रदीप्त होत नाहीं, या प्रकारच्या मन:स्थितीस **अक्रोधत्व** हें नांव आहे. बुद्धीच्या साह्यानें देहाचा अभिमान सोडून सर्व जगांतील वस्तूंचा संबंध सोडणें याला **त्याग** म्हणावें. प्रलयकालच्या पाण्याला पूर येऊन त्यांत सर्व विश्वाचा विस्तार नाहींसा झाल्यावर उगम, प्रवाह व समुद्रास मिळणें हे भेद राहत नाहींत व चोहोंकडे पाणीच पाणी होतें, त्याप्रमाणें ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी नाहींशी झाल्यावर बाकी जें केवळ ज्ञान उरतें त्यास **शान्ति** म्हणावें.

आतां **अपैशुन्य** ( दुष्टपणाचा अभाव ) म्हणजे काय तें ऐके. रोगग्रस्त लोक उपचारासाठीं आले असतां चांगला वैद्य त्यांच्यांत आपपर-भेद करीत नाहीं. चिखलांत रुतलेल्या गाईच्या क्लेशानें जो कासावीस होतो, तो ती दुभती आहे कीं भाकड आहे हें न पाहतां तिला मुक्त करतो. किंवा बुडत्याला दयेनें पाण्यांतून बाहेर काढण्यासाठीं पाण्यांत उडी मारणारा बुडणारी व्यक्ति ब्राह्मण आहे का अंत्यज आहे हें न पाहतां बुडत्याचे प्राण वांचवितो. एखाद्या पातिव्रता स्त्रीस दुष्ट लोकांनीं उघडी केली तर सभ्य लोक तिला नेसविल्यावीण पाहत नाहींत. त्याप्रमाणें दुसऱ्यांचे दोष आपल्या नजरेस पडले तर ते आधीं झांकून मग त्यांच्याकडे पाहावें. पुजून देवास पाहावें, पेरून शेतास जावें, आदरसत्कारानें संतोषवून अतिथीचे आशीर्वाद घ्यावे, त्याप्रमाणेंच आपल्या गुणांनीं दुसऱ्याचें उणें फेडून मग त्याच्याकडे पाहावें. हीं सर्व चांगुलपणाचीं लक्षणें होत. आतां **दया**. ती चंद्रप्रकाशासारखी आहे. आपल्या शीतल प्रकाशानें निववितांना ती लहानथोर हा भेद मानीत नाहीं. आपल्या स्वतःचा नाश करून वेऊन गवतास जगविणाऱ्या पाण्याइतकी दयापूर्ण वस्तु जगांत दुसरी नाहीं. त्याप्रमाणें, दुसऱ्यांच्या दुःखानें कळवळून आपल्या सर्वस्वाचा त्याग केला तरी आपण कांहींच केलें नाहीं असें मानावें. पायांत कांटा बोचला तर सर्व शरीरास दुःख होतें, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या दुःखानें आपण दुःखी व्हावें व तळपायास तेल चोळलें तर डोळे थंड होतात, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या सुखानें आपण आनंदी व्हावें. तहान लागलेल्यांना तृप्त करण्यासाठीं पाणी उत्पन्न केलें आहे, त्याप्रमाणें दुःखितांचें दुःख निवारण्यासाठींच जणूं जो जन्मला आहे, तो मूर्तिमंत दयाच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां **अलोलुपत्व**. हा गुण सूर्यासारखा आहे. कमल सूर्यास अनुसरत असलें तरी कमलाच्या सौंदर्यास सूर्य शिवत नाहीं किंवा वसंत येतांच वनश्रीची शोभा वाढते, परंतु तो मात्र तिचा मुळींच उपभोग घेत नाहीं किंवा सर्व मोठमोठ्या सिद्धींसह लक्ष्मी जरी जवळ आली तरी विष्णु तिची पर्वा करीत नाहीं, त्याप्रमाणें इहलोकींचीं किंवा परलोकींचीं सर्व इंद्रियजन्य सुखें जरी पायांपाशीं लोळत आलीं तरी त्यांचा उपभोग घ्यावा हें अलिप्त मनुष्याच्या मनांतहि येत नाहीं ! मधमाश्या मोहोळास स्पर्श करतात, जलचर

पाण्यांत पोहतात किंवा पक्षी आकाशांत उडतात, त्याप्रमाणें **मार्दव** हा गुण आहे. बालकावरचें मातेचें प्रेम अगदीं कोमल असतें. वसंत ऋतूंत मलयानिलाचा स्पर्श फार मऊ असतो. प्रियतमेची भेट डोळ्यांस फार मृदु असते. कापूर हातास फार मऊ लागतो आणि दिसावयास शुभ्र व चकचकीत असतो; तो वाटेल तितका खाण्यामुळें बाधा झाली नसती, तर कापूर मार्दवाचें उपमेय म्हणून सर्वांत श्रेष्ठ ठरला असता! महाभूतांमध्यें, त्याचप्रमाणें सूक्ष्म परमाणूंच्या पोटीं शिरणाऱ्या आकाशाप्रमाणें मनुष्यानें मृदु असावें. सुंदर मनुष्यास कोड उत्पन्न झालें किंवा संभावितावर आळ आला, तर त्यास प्राणसंकट आल्याप्रमाणें जें वाटतें, ती लाज (ह्री) होय. फिरफिरून जन्मास यावयाचें व मरावयाचें आणि जिवंतपणीं शव होऊन राहावयाचें यांत कांहीं अर्थ नाहीं, असा विचार म्हणजेच लाज! मल-मूत्र-रक्तादिकांनीं मिश्रित अशा दुर्गंधी रसांनीं भरलेल्या गर्भाशयांत पुनः पुनः जन्मास येणें व पुनः पुनः मरणें हें अत्यंत लाजिरवाणें नाहीं काय? देह धारण करून नामरूपास येणें हें देखील अत्यंत लज्जास्पद होय. **अचापल्य** (चंचलतेचा अभाव) म्हणजे कळसूत्री बाहुलीप्रमाणें आंतील सूत्र तोडतांच हातपाय न हलवितां निश्चेष्ट राहणें होय. प्राणजयानें इंद्रियांवर आपला ताबा पुनः बसवावा. सूर्य मावळला म्हणजे त्याचीं किरणें त्यांत लुप्त होतात, त्याप्रमाणें मनावर जय मिळविला कीं सर्व इंद्रियें मनांत मिसळून एकरूप होतात. मनावर व प्राणांवर विजय मिळविला कीं इंद्रियें दीन व निर्बल होतात. ही इंद्रियांची निर्बलता म्हणजेच अचापल्य होय." (ज्ञा., १३, ११३-१८५.)

### दैवी संपत्ति : ३

भगवद्गीतेंतील आणखी कांहीं श्लोकांत दिलेल्या दैवी संपत्तीचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं केलें आहे. हा तिसरा सद्गुण-समुच्चय होय. आध्यात्मिक **तेज** हा एक सद्गुण आहे. याच्यामुळें योगमार्गानें ईश्वर-प्राप्तीसाठीं प्रयत्न करीत असतां धैर्यांत मुळींच न्यूनता पडत नाहीं. प्राणेश्वरासाठीं जीव देणाऱ्या सतीस अग्निप्रवेश करतांना मृत्यु आला तरी त्याची पर्वा नसते. साधक ईश्वर-प्राप्तीसाठीं सहज व निश्चयानें प्रयत्न करीत असतां त्याच्या आड विधिनिषेध किंवा

महासिद्धी या आध्यात्मिक तेजामुळें येऊं शकत नाहींत. देहास त्यावरील केस राहूनहि त्यांबद्दल कांहीं वाटत नाहीं, त्याप्रमाणें अनेक आपत्ती सोसूनहि आलेल्या मोठेपणाचा गर्व न वाटणें यालाच **सहिष्णुता** म्हणावें. इद्रियें माजलीं असतां त्यांचा तीव्र वेग थोपवून धरणें, प्रारब्धानें दुर्धर रोग जडले किंवा प्रिय वस्तूंचा वा माणसांचा वियोग झाला असतां तो शांतपणें सहन करणें यास **धैर्य** म्हणतात. या सर्व आपत्तींचा पूर एकाच वेळीं त्याच्यावर लोटला तरीहि तो त्यास अगस्ति ऋषींपेक्षां जास्त धैर्यानें तोंड देतो. आकाशांत धुराचा लोट उठला तरी त्यास वाऱ्याची झुळूक सहज गिळून टाकते, त्याप्रमाणें आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक सर्व आपत्ती त्याच्यावर एकदम कोसळल्या तरी त्या सर्व तो गिळून टाकतो व चित्तक्षोभाच्या अतिशय कठिण प्रसंगींहि आपल्या मनाची समता कायम ठेवतो. आतां **पावित्र्य.** हें बाहेरून स्वच्छ घासलेल्या व आंत पवित्र गंगेचें पाणी भरलेल्या शुद्ध सोन्याच्या कळशीप्रमाणें असतें. शरीरानें निष्काम कर्मे करावयाचीं व अंतःकरणांत पूर्ण विवेक बाणूं द्यावयाचा, हेंच मूर्तिमंत पावित्र्य. **अद्रोहत्व** किंवा सर्वांविषयीं प्रेम हें पवित्र गंगेच्या पाण्यासारखें असतें : गंगेचें पाणी लोकांचें पाप व त्यांचा ताप नष्ट करीत व तीरावरील वृक्षांना पोषीत समुद्रास जाऊन मिळतें; सूर्य जगाचा अंधळेपणा नाहींसा करीत व तेजाचीं मंदिरें उघडीत विश्वाची प्रदक्षिणा करावयास निघतो; त्याप्रमाणें अद्रोही मनुष्य बद्धांना मुक्त करतो, बुडत्यांना तारतो व आर्तांचीं संकटें नाहींशीं करतो. मानव्याचें हित व त्याची उन्नति साधण्यासाठीं रात्रंदिवस प्रयत्न करणें हें त्याचें मुख्य ध्येय असून तें प्राप्त करून घेत असतां सहज आपलेंहि हित साधतां आलें तर तो साधतो. परंतु ज्यामुळें प्राणिमात्रांचें अहित होईल अशी गोष्ट आपल्या स्वार्थासाठीं तो करील हें मात्र मुळींच संभवत नाहीं. शंभूच्या डोक्यावर येऊन बसतांना गंगा जशी संकोच पावते, त्याप्रमाणें मान्यता मिळाली असतां संकोच पावणें म्हणजेच **अमानित्व** होय. (ज्ञा., १६, १८६–२०६.) वर विस्तृतपणें वर्णिलेले सव्वीस सद्गुण म्हणजेच मोक्षसंप्राप्ति मिळविण्याची संपूर्ण तयारी असें ज्ञानेश्वर सांगतात. हे सद्गुण म्हणजे सव्वीस फुलांची माळ असून ती 'मुक्ति'–वधू

आपल्या हातांत घेऊन निरपेक्ष "वैराग्य"-वराच्या गळ्यांत घालण्यास निघाली आहे ! किंवा ही सव्वीस वातींची ज्योत पेटवून श्रीगीतादेवी आपला पति जो आत्मदेव त्याच्या भोंवतीं आरती ओंवाळण्याला आली आहे ! किंवा हे सव्वीस सद्गुण म्हणजे गीतासागरांतील दैवी संपत्तीच्या शिंपांत सांपडलेले सव्वीस सुढाळ मोतीच आहेत !" ( १६, २०७-१२. )

## आसुरी संपत्ति

आसुरी संपत्तींत ज्या दुर्गुणांचा समावेश केला आहे त्यांचें क्रमशः वर्णन ज्ञानेश्वरांनीं यापुढें दिलें आहे. हे दुर्गुण सहा आहेत : दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, कठोरता व अज्ञान. गुरूनें दिलेली विद्या चव्हाट्यावर आणली, तर ती वस्तुतः इष्ट फल देणारी असली तरी घातक होते. पुरांतून पैलातिरीं नेणें हें नावेचें काम; परंतु तीच नाव जर मनुष्याच्या डोक्यास बांधली तर ती त्यास खास बुडविते; त्याप्रमाणें जो दिसेल त्यापुढें आपल्या परोपकार-कृत्याची व धर्माची टिमकी वाजविली तर तोच तारणारा धर्म नाशास कारण होतो. **दर्प** हा चाबूकस्वाराच्या घोड्याप्रमाणें असतो; तो इंद्राच्या ऐरावतालाहि आपल्यापेक्षां हीन लेखतो ! किंवा तो कांट्यावरील सरड्याप्रमाणें असतो; या सरड्यास कांटेरी कुंपणच स्वर्गापेक्षांहि श्रेष्ठ वाटतें ! काडीस लागलेली आग उगीचच आकाश गवसूं पाहते, डबक्यांतील मासा समुद्रास तुच्छ मानतो, त्याप्रमाणें गर्विष्ठ मनुष्यास आपली स्त्री, विद्या, स्तुति, आपलें धन किंवा आपला मान यांचा अभिमान वाटतो. थोडा वेळ आपल्यावर ढगाची छाया आहे हें पाहून मूर्ख मनुष्यानें आपलें घर पाडावें किंवा मृगजळ पाहून पाण्याचें तळें फोडावें, त्याप्रमाणें दर्पयुक्त मनुष्याचें वर्तन असतें. पतंगाला दिवा आवडत नाहीं. काजव्यानें सूर्यास मागें टाकण्याचा प्रयत्न करावा किंवा टिटवीनें समुद्राशीं वैर करावें, त्याप्रमाणें **अभिमानाच्या** मोहानें मनुष्यास ईश्वराचें नांव सुद्धां सहन होत नाहीं. तो वडिलांसहि आपला प्रतिस्पर्धी मानतो. हा मूर्तिमंत रौरव नरकाचा मार्ग होय. **रागीट** मनुष्यास दुसऱ्याचें सुख पाहवत नाहीं. तें **सुखच** त्याचा क्रोधाग्नि भडकविण्यास कारण होतें. उकळत्या तेलांत

पाण्याचे थेंब टाकल्यानें जास्तच भडका उडतो, चंद्रप्रकाश पाहून कोल्हा पोटांत जळफळतो, ज्याच्या उदयानें विश्वाचें आयुष्य उजळतें तोच सूर्य प्रातःकाळीं उगवला कीं पापी घुबडाचे मात्र डोळे फुटतात, जगाला सुखविणारी पहांट चोराला मात्र मरणापेक्षांहि त्रासदायक वाटते, सापाच्या पोटांत गेलेल्या दुधाचें जहरी विषच बनतें किंवा समुद्रांत पेटलेला वडवाग्नि अगाध पाणी शोषूनहि पुनः जास्तच प्रदीप्त होतो, त्याप्रमाणें दुसऱ्याची विद्या, दुसऱ्याचें शहाणपण वा दुसऱ्याचें वैभव पाहून रागीट मनुष्याचा राग दुणावतो! **कठोर** मनुष्याचें मन सापाच्या बिळाप्रमाणें असतें; त्याची दृष्टि म्हणजे बाणांचा वर्षाव, त्याचें बोलणें म्हणजें निखाऱ्यांची वृष्टि व त्याची कृति पोलादी करवताप्रमाणें तीक्ष्ण व बोंचक असते. **अज्ञानी** मनुष्य दगडाप्रमाणें असतो : दगडास थंडी व उष्णता कळत नाहींत. जात्यंधाप्रमाणें त्यास दिवस व रात्र यांतील भेदहि कळत नाहीं. तो पळीप्रमाणें अनेक पदार्थांत फिरूनहि कोणत्याच पदार्थाचा रस चाखूं शकत नाहीं, म्हणून जाणतहि नाहीं. तान्ह्या मुलाप्रमाणें चांगलें किंवा वाईट हा भेद न जाणतां तो सर्वच आपल्या तोंडांत टाकतो. पापपुण्याची खिचडी केल्यामुळें त्यांचे परिणाम त्यास कळत नाहींत." (ज्ञा.,१६, २१७–२५२.) ह्या सहा दुर्गुणांनीं संपूर्ण आसुरी संपत्ति बनते. साप लहान असला तरी त्याचें विष भयंकर असतें. हे सहा दुर्गुण म्हणजे एकाच राशींत जमलेला जणूं सहा क्रूर ग्रहांचा समुदायच! मरणाऱ्याच्या अंगांत सर्वच रोग शिरावे, वाईट मुहूर्तावर सर्वच कुयोग जमावे किंवा शेळी मरत असतां तिला सात नांग्यांच्या इंगळीनें चावावें, त्याप्रमाणें परमार्थ विसरून संसारांत बुडणाऱ्याच्या अंगीं हे सर्व सहा दोष एकदम शिरतात, त्याची सारखी अवनति होत जाते व तो हीन योनींत जन्मतो किंवा एकादा दगड होऊन पडतो." (ज्ञा.,१६,२५३–२६३.) "जे आसुरी संपत्तीमुळें ईश्वराशीं विरोध करतात ते मूढ लोक अत्यंत अधम योनींत जन्मतात व ही हीन योनि म्हणजे क्लेशरूपी गांवाचा जणूं उकिरडा किंवा संसारपुरीचा पाणवठा( घाण पाणी सांचण्याची जागा )च होय. ते वाघ किंवा विंचू अशा दुष्ट योनींत जन्मतात व त्यांना खावयास अन्न मिळत नाहीं. भुकेनें अतिशय व्याकुळ झाले म्हणजे ते आपल्याच अंगाचे लचके तोडून

खातात किंवा बिळांत कोंडलेल्या सापाप्रमाणें ते आपल्याच विषानें आपला देह जाळून टाकतात! श्वास बाहेर टाकण्यासहि त्यांना विश्रांति मिळत नाहीं. अशा क्लेशमय योनींत त्यांना कल्पचे कल्प राहावें लागतें. ते मूर्तिमंत अंधकार बनतात व या अंधारामुळें जास्त काळवडतात. त्यांना पाहून पापहि भयानें थरारतें, नरकासहि त्यांची भीति वाटते, तापहि तापतो व त्यांच्यामुळें मलहि जास्त मलिन होतो. त्यांचें नांव ऐकून महाभयहि भितें व पळून जातें, पाप जास्त पापी होतें व विटाळहि जास्त विटाळतो. त्यांच्या निकृष्ट व पापी अवस्थेचें वर्णन करतांना वाचा अडखळते व मन कचरतें. काय ही नरकवासाची जोड या मूर्खांनीं करून घेतली! ज्या आसुरी मार्गामुळें यांना हें घोर पतन प्राप्त झालें तो यांनीं आपण होऊन कां पत्करला?" (ज्ञा.,१६,४०७-२२.)

## इतर सामान्य सद्गुण

वरील सर्व विवेचनावरून वाचकांच्या सहजच लक्षांत आलें असेल कीं, तेराव्या अध्यायांत ज्ञान व अज्ञान या सदराखालीं व सोळाव्या अध्यायांत दैवी व आसुरी संपत्ति या मथळ्याखालीं ज्ञानेश्वरांनीं विविध नैतिक सद्गुण व त्यांचीं विकृत रूपें यांचें जें वर्णन दिलें आहे, त्यावरून अशा मनांच्या अवस्थांचें सूक्ष्म पृथक्करण करण्याच्या कामीं ते अत्यंत प्रवीण आहेत असें दिसतें. ज्ञानेश्वरीच्या इतर अध्यायांत आणखी कांहीं सामान्य सद्गुणांचें वर्णन इतस्ततः विखुरलेलें आहे, त्यांचीहि थोडी माहिती येथें देणें जरूर आहे. दुसऱ्या अध्यायांत बुद्धीचें महत्त्व वर्णिलें आहे : "ही अल्पशः जरी हृदयांत प्रकट झाली, तरी संसाराचें भय नाहींसें होतें. दीपकलिका लहान असली तरी तिचा प्रकाश मोठा असतो म्हणून तिला धाकटी म्हणूं नये. सुबुद्धि ही दीपकालिकेप्रमाणें आहे. परीस इतर दगडांप्रमाणें सुलभ नाहीं व मोठ्या सुदैवानें देखील अमृताचा एक थेंबहि मिळणें शक्य नसतें, त्याप्रमाणेंच सद्बुद्धि दुर्मिळ असते. गंगेस सागर जसें अंतिम ध्येय त्याप्रमाणें सद्बुद्धीस परमात्माच अंतिम ध्येय होय. 'ईश्वरावांचून दुसरी कोणतीहि गति ज्या मनाच्या शक्तीला नाहीं ती सद्बुद्धि होय,' अशी सद्बुद्धीची

व्याख्या देतां येईल. " ( ज्ञा., २, २३७–४२. ) सहाव्या अध्यायांत ' ईश्वर-प्राप्तीसाठीं वैराग्य अत्यंत अवश्यक आहे ' असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे. " परमेश्वर प्राप्त होण्यापूर्वी आपल्या मनांत वैराग्य बिंबलें आहे काय हें प्रथम प्रत्येक मनुष्यानें पाहावें. मनुष्य वयानें लहान असला तरी लहान वृक्षाप्रमाणें त्यास जर वैराग्य–वसंतांत पालवी फुटली असली, तर त्यास ईश्वर–प्राप्तीचें फळ मिळण्यास फार वेळ लागणार नाहीं. " ( ज्ञा., ६, ४७–५०. ) याच अध्यायांत **वासनांचा नाश** म्हणजेच आत्मज्ञान होय असें सांगितलें आहे. ज्यांनीं आपल्या मनावर विजय मिळविला आहे व संकल्पांचा लोप केला आहे, त्यांना ईश्वर दूर नाहीं. हिणकस सोन्यांतील दोष काढून टाकले कीं तेंच बावनकशी सोनें होतें, त्याप्रमाणें संकल्प नाहींसे झाले कीं जीवच ब्रह्म होतो. घट फुटला म्हणजे ज्याप्रमाणें त्यांतील आकाश अनंत आकाशांत मिळून जातें, त्याप्रमाणें देहाचा अहंकार नाहींसा झाला कीं जीव मूळचें ब्रह्मच आहे. ( ज्ञा., ६, ८१–८४. ) याच अध्यायांत प्रत्येक गोष्टींत **सुवर्णमध्य** साधणें हें परमार्थास अत्यवश्यक आहे असें सांगितलें आहे : " आहार घ्यावा, पण तो परिमित असावा. त्याचप्रमाणें क्रिया करतांना सुद्धां परिमिति पाळावी, मोजकेच शब्द बोलावे, मोजून पावलें टाकावीं, निद्रा सुद्धां प्रमाणांतच घ्यावी व जागणेंहि परिमितच असावें. याप्रमाणें शरीरांत समतोलपणा भिनला म्हणजे सुख प्राप्त होतें." ( ज्ञा. ६, ३४९–५१. ) बाराव्या अध्यायांत साधूच्या आत्यंतिक **समतेचें** वर्णन ज्ञानेश्वरांनीं फारच कौशल्यानें केलें आहे : " अशा मनुष्याच्या ठिकाणीं वैषम्याची वार्ता सुद्धां नसते. तो शत्रुमित्रांशीं सारखा असतो. घरच्या लोकांना उजेड द्यावा व परक्यांना अंधार पाडावा हें दिवा जाणत नाहीं. जो बीं लावून वाढवितो व जो तोडावयासाठीं घाव घालतो, त्या दोघांसहि वृक्ष एकसारखीच सांवली देतो; ऊंस पाळतो त्यास तेवढा गोड लागतो, पण त्याचा रस गाळतो त्यास कडू लागतो असें नाहीं; त्याप्रमाणें शत्रु–मित्र, मान–अपमान, या बाबतींत त्याचा भाव समान असतो. आकाशास लेप लागत नाहीं त्याप्रमाणें तो स्तुतीनें फुगत नाहीं वा निंदेनें त्रस्त होत नाहीं. तो खरें व खोटें दोनहि न बोलतां मौन पाळतो व ही उन्मनी स्थिति तो भोगत असतां तींत

खंड पडत नाहीं. सहज लाभ झाला तर त्यास आनंद वाटतो; परंतु समुद्र जसा पाऊस पडला नाहीं तरी सुकत नाहीं, त्याप्रमाणें तोटा झाला तरी तो दुःखी होत नाहीं. वाऱ्यास जसें कायमचें घर नसतें, त्याप्रमाणें ता कायम कोणत्याच जागेचा आश्रय घेत नाहीं. 'हें विश्वच माझें घर आहे' असा त्याच्या मनाचा निश्चय असतो; किंबहुना तो वस्तुतः आपणच हें सर्व चराचर विश्व होतो." (ज्ञा., १२, १९७–२१३.)

## यज्ञाचें स्वरूप

सतराव्या अध्यायांत ज्ञानेश्वरांनीं **यज्ञ** व **तप** या दोन विषयांचें उत्तम विवेचन केलें आहे. भगवद्गीतेच्या आधारें या दोनहि नैतिक सद्गुणांस मानसशास्त्रीय पार्श्वभूमि असते असें ज्ञानेश्वरांनीं प्रतिपादिलें आहे व यज्ञ व तप हीं तीन प्रकारचीं—सात्त्विक, राजस तामस. असतात असें सांगितलें आहे. प्रथम यज्ञाविषयीं त्यांनीं काय प्रतिपादिलें आहे तें पाहूं : "राजसगुणप्रधान यज्ञाचें ध्येय कीर्ति मिळविणें हें होय," या एका वाक्यानें राजस यज्ञाचें थोडक्यांत वर्णन दिलें आहे. त्याचप्रमाणें तामस यज्ञाचें अंतिम स्वरूप म्हणज मूर्खपणा असें थोडक्यांत म्हणतां येईल. तेव्हां सत्त्वगुण-प्रधान यज्ञाचेंच महत्त्व फार आहे. पतिव्रता ज्याप्रमाणें आपल्या पतीशिवाय दुसऱ्या कोणाविषयींहि कामवासना बाळगीत नाहीं, त्याप्रमाणें परमेश्वर—प्राप्ती-शिवाय यज्ञांत दुसरी कोणतीच फलाशा न ठेवणें म्हणजेच सात्त्विक यज्ञ होय. गंगा सागरास मिळाल्यावर ती पुढें शिरकाव करीत नाहीं, आत्मचर्चा सुरू झाली कीं वेद थांबतो, पाणी मुळास घातल्यावर सर्व झाडास तें मिळाल्यामुळें पुढें जात नाहीं, त्याप्रमाणें देहानें व मनानें यजमान यज्ञ-क्रियेंतच विरून गेल्यामुळें दुसरी कांहींच फलाशा ठेवीत नाहीं. आपण आरशांत आपलें प्रतिबिंब पाहतों, तळहातावरचें रत्न दीपाच्या साह्यानें पाहतों किंवा सूर्य उगवल्यावर आपल्यास आक्रमावयाचा मार्ग पाहतो, त्याप्रमाणें वेदाज्ञेप्रमाणें यज्ञास लागणारी सर्व साधन—सामग्री एकत्र आणून यजमान तिचा योग्य विनियोग करतो व यत्किंचितहि अहंकाराचा डाग लागूं न देतां यज्ञकर्म पुरें करतो. फळांचें

फुलांची किंवा सांवलीची कांहींच आशा न ठेवतां घरीं तुळशीचें झाड लावावें, त्याप्रमाणें ज्या यज्ञांत फलाशेचा उल्लेख मुळींच नसतो तोच खरा सात्त्विक यज्ञ होय. ( ज्ञा , १७, १७०-१९४. )

### सात्त्विक तप

सत्त्व, रज व तमोगुण यांच्या प्राधान्याप्रमाणें तपाचेहि सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार होतात. सात्त्विक तप शारीरिक, वाचिक किंवा मानसिक असूं शकतें. अनेक तीर्थयात्रा करण्यांत व प्रदक्षिणा करण्यांत चोवीस तास पायांनीं चालत राहणें यास शारीरिक तप म्हणावें. देवळें सुशोभित करण्यांत व फुलें व धूप देवास अर्पण करण्यांत हात गुंतलेले असावे. देवाची प्रतिमा दिसली किंवा शिवलिंग दिसलें कीं शरीर तीपुढें किंवा त्यापुढें काठीप्रमाणें साष्टांग व सपशेल पडावें. विद्येनें वा सद्गुणांनीं आपल्यापेक्षां जे वडील असतील त्यांची चांगली सेवा करावी. प्रवासानें श्रमलेल्यांना किंवा इतर संकटांनीं ग्रस्त झालेल्यांना सुख देणें म्हणजेहि शारीरिक तप होय. सर्व तीर्थांपेक्षां श्रेष्ठ अशा आपल्या मातापितरांच्या सेवेंत आपला देह झिजवावा. ज्याच्या दर्शनानें संसाराचा शीण तात्काळ नाहींसा झाला व ज्यानें अत्यंत कृपाळूपणें आपणास ज्ञानदान दिलें त्या सद्गुरूची विशेषतः पूजा करावी. देह उपजतच आळशी असतो. म्हणून त्यास सतत सत्कर्में करावयास लावावें. सर्व प्राणिमात्रांत ईश्वर भरून राहिला आहे असें समजून त्यांस प्रणाम करावा, दुसऱ्यावर उपकार करावे आणि स्त्रियांच्या बाबतींत नेहमीं पूर्णपणें संयम पाळावा. जन्माच्या वेळीं मात्र स्त्री-देहाचा विटाळ व्हावा. त्यानंतर कोणत्याहि स्त्रीचा स्पर्श मुळींच होऊं देऊं नये." ( ज्ञा., १७, २०२-११. ) येथवर शारीरिक तपाचें वर्णन झालें. आतां वाचिक तप किंवा वाङ्मय-तप म्हणजे काय हें पाहूं. " दुसऱ्यांस न दुखवितां त्यांना सहज सुख होईल असें बोलणें म्हणजे वाङ्मय तप होय. परीस लोखंडाच्या तुकड्याचें वजन कमी न करतां त्यास सुवर्णमय करतो; पाणी प्रथम झाडाच्या मुळाशीं जातें, परंतु त्याबरोबरच सहज गवतासहि उगवण्यास मदत करतें; त्याप्रमाणें एकाशीं बोलत असतां सहज सर्वांचें हित व्हावें.

अमृताची गंगा जर सांपडली तर ती जीवांना अमर करते आणि ताप, पाप व दैन्य हरण करून गोडीहि देते, असें दिसून येईल. आपणाशीं कोणी बोलला तरच आपण बोलावें. नाहीं तर देवाचें—मग तो शैव, वैष्णव कोणताहि असो—नामस्मरण करीत राहावें." ( ज्ञा. १७, २१६-२३. ) सरोवराच्या पाण्यावर लाटा नसल्या म्हणजे तें शांत असतें, आकाशांत ढग नसले म्हणजे तें निरभ्र असतें किंवा चंदनवनांतले सर्प पळून गेले म्हणजे तें शांत असतें, त्याप्रमाणें मनाच्या आशा व शंका सर्व नाहींशया झाल्यावर मन आपल्या केवळ आत्मस्वरूपांतच स्थिर राहतें व यासच मानसिक तप म्हणतात. कलाहीन व वैषम्यरहित चंद्राची, व्याधिरहित राजाची, किंवा मंदराचलरहित क्षीरसमुद्राची उपमा त्यास साजेल. चंद्र कलंकरहित असता किंवा तो नित्य पूर्ण व स्थिर असता, तरच त्याची या नितांत शुद्ध व सात्त्विक मनःस्थितीशीं तुलना करतां आली असती. तेथें वैराग्याची उत्कंठा बुजते, मनाची धडपड जिरते व केवळ आत्मबोधाची शुद्धता बाकी राहते. पाण्यांत टाकलेल्या मिठाचें मीठपण नाहीसें होतें, त्याप्रमाणें आपलें इष्ट ध्येय गांठल्यामुळें मनाचें मनपण नाहींसें होतें. तळहात सहजच रोमरहित व शुद्ध असतो, त्याप्रमाणें अशा मनांत भावशुद्धि आपोआप येऊन राहते. अशा मनःस्थितीस मानस तप म्हणणें योग्य होईल. ( ज्ञा. १७, २२५-३६. )

**राजस तप**

ज्या तपाच्या साह्यानें मनुष्य मोठेपणाच्या शिखरावर जाऊं इच्छितो, तें तप राजस होय : " त्रिभुवनांतील सर्वांत मोठा मान आपणास मिळावा असें त्यास वाटतें. भोजनाच्या वेळीं सर्वांत मोठी मानाची जागा आपणास पाहिजे, विश्वाच्या स्तोत्रास आपणच पात्र व्हावें, सर्व जगानें आपलीच यात्रा करावी व दुसऱ्या लोकांची पूजा करणाऱ्यांना सुद्धां हा आपलाच आश्रय आहे असें वाटावें अशी त्याची इच्छा असते. म्हातारी वेश्या आपलें शरीर दागिन्यांनीं नटवून तरुणांचें मन आकर्षू पाहते, त्याप्रमाणें असा मनुष्य वागतो. धन किंवा मान मिळविण्याच्या उद्देशानें केलेलें तप राजस होय. गाय नुकतीच व्याली

UERABAD

असली, तरी तिच्या स्तनाचें दूध किडयानें खाल्लयामुळें ती दूध देईनाशी होते; उभें शेत गुरांस चरावयास सोडल्यावर कांहींच पीक हातीं येत नाहीं; त्याप्रमाणें आपली फुशारकी मारण्याकरतां केलेलें तप सर्वथा वायां जातें. जो आकाश व्यापून आपल्या गडगडाटानें जणूं ब्रह्मांड फोडतो असा अवेळीं आलेला ढग फार वेळ आकाशांत राहूं शकेल काय ? " ( ज्ञा., १७, २४२–५१. )

## तामस तप

" मूर्खपणाचा वारा जीवीं भरून स्वतःच्या देहास शत्रु मानणें, पंचाग्नीनें त्यास क्लेश देणें, डोक्यावर गुग्गुळ जाळणें, लोखंडी खिळ्यांवर उताणें निजणें किंवा शरीराची अग्नींत आहुतीच देणें म्हणजे तामस तप होय. त्याचप्रमाणें खालीं ताड व वर पाय करून धूर गिळणें, थंडीनें गोठलेल्या पाण्याच्या तीरावर किंवा बर्फाच्छादित खडकावर राहणें किंवा जिवंत शरीराच्या मांसाचे लचके तोडणें या सर्व क्रिया म्हणजे तामसी तप होय. पर्वत–शिखरावरून सुटलेला धोंडा ज्याप्रमाणें आड आलेल्या प्रत्यक वस्तूचें पीठ करतो व आपण स्वतःहि फुटून शतशः तुकडे बनतो, त्याप्रमाणें तामसी तपानें स्वतःस अनंत क्लेश होतात व सुखांत असलेले इतर जीवहि दुःखांत पडून नाश पावतात. " ( ज्ञा., १७, २५४–६२. )

## ईश्वरास शरण

ज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या शेवटच्या म्हणजे अठराव्या अध्यायांत ईश्वरास शरण जाणें या सद्गुणाचें नातिक नव्हे तर तात्त्विक स्वरूप काय याविषयीं चर्चा केली आहे. ईश्वराशीं एकरूप होणें म्हणज त्यास खरें शरण जाणें होय, असें स्पष्ट म्हटलें आहे. श्रीकृष्णाशीं अर्जुन पूर्णपणें तन्मय झाला तेव्हांच " तो श्रीकृष्णास शरण गेला " असें म्हणणें योग्य. जीवभाव विसरून माझें अभेदपणें एकरूप जाणून मला मिळणें म्हणजेच मला शरण येणें होय. घट फुटला म्हणजे ज्याप्रमाणें आकाशांत आकाश मिसळून जातें, त्याप्रमाणें तूं माझ्या ऐक्यांत विरून मला शरण ये. सुवर्णमणी सोन्यांत किंवा लाटा पाण्यांत

मिळून शरण जातात, त्याप्रमाणें तूं मला शरण ये. मला जीव शरण आला कीं मग तो जीवरूपानें स्वतंत्र राहिला ही भाषा मूर्खपणाची आहे ! सामान्य राजाची बटीकहि त्याला खुष करते तेव्हां त्याच्यासमान होते; मग मी विश्वेश्वर भेटल्यावर जीवग्रंथी न सुटतां जीव स्वतंत्र राहतो ही भाषा मूर्खपणाची व खोटी नव्हे का ? ती तूं ऐकूं देखील नकोस ! ताक घुसळून त्यांतून लोणी काढल्यावर तें पुनः ताकांत टाकलें तरी त्यांत मिसळत नाहीं, त्याप्रमाणें अद्वितीयत्वानें मला शरण आल्यावर सहजच तुला धर्माधर्माचा लेप लागणार नाही. लोखंड स्वतंत्र ठेवलें असतां गंजतें; पण तेंच परिसाच्या संगतीनें सोनें झाल्यावर गंजणार नाही. काष्ठांतून मंथन करून अग्नि बाहेर काढल्यावर तो पुनः कधींहि काष्ठ होणार नाहीं ! सूर्य उगवल्यावर अंधार पुनः त्याच्यापुढें येईल काय ? जागृत झाल्यावर स्वप्नभ्रम राहील काय ? त्याप्रमाणें तूं माझ्याशीं एकरूप झाल्यावर मी सर्वरूप असल्यामुळें माझ्याबाहेर कांहींच राहण्याचें कारण नाहीं. " माझ्या पापपुण्यांचें काय होईल ? " ही चिंता तूं बाळगूं नको. तीं सर्व मद्रूप होऊन माझ्या ज्ञानांत विरून जातील व त्यांचा मागमूस देखील राहणार नाहीं. अर्जुना, याच क्षणापासून तूं मुक्त झाला आहेस ! या दृष्टीनें तूं माझ्या स्वरूपाचा विचार कर, म्हणजे मी तुला सोडवीन. तूं कांहीं चिंता वाहूं नकोस. मला एकत्वानें शरण ये. " ( ज्ञा., १८, १३९८–१४१६. )

## आदर्श कर्मयोगी

भगवद्गीतेंतील तत्त्वास धरून ज्ञानेश्वरांनीं आदर्श कर्मयोगी कर्म व अकर्म यांच्या समन्वयानें नैष्कर्म्य–सिद्धि कशी मिळवितो हें अनेक ठिकाणीं वर्णिलें आहे. चौथ्या अध्यायांत खऱ्या कर्मयोग्याची सूर्याशीं तुलना केली आहे: " सूर्य उगवतो व मावळतो म्हणून तो फिरतो असें वाटतें, परंतु वस्तुतः तो फिरत नाहीं. त्याप्रमाणें कर्म करत असतांनाच कर्मयोगी नैष्कर्म्यतत्त्व आचरतो. सूर्याचें बिंब पाण्यांत बुडत नाहीं, त्याप्रमाणें कर्मयोगी मानवासारखा दिसला तरी तो वस्तुतः मानव नाहीं. तो न पाहतांच सर्व विश्व पाहतो, कांहींहि न करतां

सर्व करतो, कांहींहि न भोगतां सर्व वस्तू भोगतो, एकाच ठिकाणीं बसला तरी सर्वत्र जातो, किंबहुना तो आपणच स्वतः सर्व विश्व होतो. " (ज्ञा., ४, ९९–१०२.) या ठिकाणीं ज्ञानेश्वरांनीं सूर्य फिरतोसा दिसला तरी खरोखर स्थिर आहे हें खगोलशास्त्रांतील मूळ तत्त्व सांगितलें आहे. सूर्य ग्रहमालेचें केंद्र असून त्याच्याभोंवतीं सर्व ग्रह फिरतात हा खगोलशास्त्रांतील शोध युरोपीय राष्ट्रांसहि लागला नव्हता अशा वेळीं संत ज्ञानेश्वरांनीं हें तत्त्व स्पष्टपणें प्रतिपादिलें आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. असो. हें विषयांतर सोडून पुनः प्रस्तुत विषयाकडे वळूं. आदर्श कर्मयोग्यास नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त झाली असली तरीहि त्यास लोकांसाठीं कर्तव्य करावें लागतें असें ज्ञानेश्वर सांगतातः " अंधळ्यांच्या पुढें त्यांना वाट दाखविण्यासाठीं डोळस मनुष्य चालतो, त्याप्रमाणें अज्ञानी लोकांस कोणी तरी धर्म आचरून दाखवावा लागतो. ज्ञानी लोकांनीं याप्रमाणें अज्ञानी लोकांस खरा मार्ग दाखविला नाहीं तर त्यांना तो कसा समजणार ? वडील माणसें जें जें करतात त्यासच धर्म हें नांव मिळतें व त्याप्रमाणें सामान्य जन आचरतात. " (ज्ञा., ३, १५५–५८.) " आईचें दूध ज्याला जास्त कष्टानेंच पचतें अशा तान्ह्या मुलास पक्वान्न कसें द्यावयाचें ? पक्वान्नें अशा मुलांसाठीं नसतात. त्याचप्रमाणें कर्में करण्याची सुद्धां ज्यांची पात्रता नाहीं, त्यांस निष्काम कर्माचा उपदेश थट्टेनें सुद्धां योग्यानें कधींहि करूं नये. त्यांना सत्कर्मेंच करण्यास सांगावें. त्यांच्यापुढें चांगल्या कर्मांचीच स्तुति करावी व तीं स्वतः योग्यानें त्यांना आचरून दाखवावीं. याप्रमाणें लोकसंग्रहासाठीं योग्यानें कर्में केलीं, तर तीं त्यास केव्हांहि बंधनकारक होत नाहींत. राजा किंवा राणी यांचीं सोंगें घेणारे बहुरुपी स्त्रीपुरुषभाव मनीं न आणतां लोकसंपादणी मात्र हुबेहूब करतात. " (ज्ञा., ३, १७२–७६.) म्हणून खऱ्या कर्मयोग्यानें दुसऱ्यांना सत्कर्माचरणाचा उपदेश करावा व आपण मात्र नैष्कर्म्याच्या शुद्ध आनंदांत स्थिर होऊन राहावें.

### कर्मांपासून नैष्कर्म्य–प्राप्ति

कोणत्या व कसल्या कर्माचा उपदेश कर्मयोग्यानें लोकांना करावा याबद्दल ज्ञानेश्वरांनीं अठराव्या अध्यायांत विस्तृतपणें सांगितलें आहे : " यज्ञ,

दान, तपादिक अवश्यक कर्में सर्वांनीं केलींच पाहिजेत. पुढें उमटलेल्या पावलांची वाट वाटसरूनें सोडूं नये, पैल थडीं गेल्याशिवाय नाव सोडूं नये, लेंगर लागल्याशिवाय केळीचें झाड तोडून टाकूं नये, हरवलेली वस्तु सांपडे-पर्यंत हातांतला दिवा मालवूं नये; त्याप्रमाणें आत्मज्ञानाविषयीं पूर्ण निश्चितता आल्याशिवाय यज्ञादिक कर्माविषयीं कोणीं उदास होऊं नये. उलट, अधिकारा-प्रमाणें साक्षेपानें तीं जास्तच आचरावीं. वाचेचा अतिरेक म्हणजेच मौन त्या-प्रमाणें कर्मातिशय म्हणजेच नैष्कर्म्य होय. सोनें फिरफिरून मुशींत घालून शुद्ध केलें म्हणजे त्यांतील सर्व मळ नाहींसा होऊन तें अत्यंत शुद्ध होतें. निष्ठेनें कर्म वारंवार करीत गेल्यानें रज व तम यांचा मळ झडून जाऊन पूर्ण शुद्ध सत्त्वगुण अंगीं बाणतो. यासाठीं, हे धनंजया, ज्याला पूर्ण सत्त्वशुद्धि प्राप्त करून घ्यावयाची आहे त्यास कर्में हीं निर्मळ व पवित्र तीर्थाप्रमाणें उपयोगीं पडतात. पवित्र तीर्थानें बाह्यशुद्धि होते, तर कर्मानें अन्तःशुद्धि होते. मारवाडांत तहानेनें व्याकुळ झालेल्यास अमृतकुंड दृष्टीस पडावा, बुडत्याला नदीनेंच वांचवावें, पडणाऱ्यास पृथ्वीनेंच कळवळा येऊन सांवरावें, मरणाऱ्याची मृत्यूनें आयुष्यवृद्धि करावी किंवा रोग्यास रसायनविषानेंच वांचवावें, त्याप्रमाणें कर्म करण्याची हातोटी ज्यास साधली तो कर्माच्या बंधनापासून मुक्त होऊन मोक्षास पात्र होतो." (ज्ञा., १८, १४९–६३.)

### कर्म व ज्ञान

कर्म व ज्ञान हीं भिन्न असल्याचें लोक अनादिकालापासून मानीत आले आहेत व ज्ञानेश्वरहि भगवद्गीतेस अनुसरून कर्माचरण व ईश्वरज्ञान यांत फार मोठा भेद असल्याचें अनेक वेळां सांगतात. ज्ञानाच्या दृष्टीनें कर्म अगदींच क्षुल्लक आहे असें ते प्रतिपादितात. आश्रमधर्माचीं कर्तव्यें चोखपणें केल्यामुळें जे स्वतः विधिमार्गाच्या कसोटीची शिळा बनले आहेत, यज्ञ केल्यामुळें ज्यांचें कौतुक करून तीनहि वेद मान डोलवितात, असे मूर्तिमंत यज्ञ बनलेले दीक्षित पुण्याच्या नांवानें पाप जोडतात! कारण, कल्पवृक्षाखालीं बसून झोळीस गांठी घालाव्या व भिक्षेस निघावें, त्याप्रमाणें हे दीक्षित यज्ञाच्या

मुख्य हेतु जो मी त्या मला विसरून व तिन्ही वेदांचें ज्ञान संपादून शेंकडों यज्ञ करतात व स्वर्ग मिळवितात ! मजवांचून स्वर्ग मिळविणें हा अज्ञान्यांचा पुण्यमार्ग आहे; ज्ञानी लोक त्यास उपसर्ग व हानि समजतात. नरकाच्या दुःखाशीं असलेल्या विरोधामुळें स्वर्गास सुख हें नांव मिळालें आहे. या दोहोंहि-पेक्षां माझें नित्यानंद व निर्दोष स्वरूप भिन्न आहे. मला येऊन मिळाल्यावर स्वर्ग व नरक या चोरांच्या आडवाटा आहेत हें समजतें. पुण्यात्मक पापानें स्वर्ग व पापात्मक पापानें नरक प्राप्त होतात; माझी प्राप्ति ज्यामुळें होते तें निर्मळ शुद्ध पुण्य होय. वस्तुतः तें माझ्यांत अंतर्भूत असून माझ्यापासून ते दुरावतात व त्यास पुण्य म्हणतात ! असें असत्य बोलल्याबद्दल त्यांची जीभ कां तुटत नाहीं ? मला न जाणणें या पापरूपी पुण्यानें ते स्वर्गास जातात व हें पुण्य संपलें कीं त्यांचे इंद्रपण सुद्धां सरतें व ते पुनः मृत्युलोकांत येतात. वेश्या-भोगामध्यें सर्व पैसा उधळल्यावर तिच्या दाराजवळहि जातां येत नाहीं, त्याप्रमाणें आयुष्य अत्यंत लाजिरवाणें होतें. म्हणून पुढें त्याचें वर्णन कर-ण्याची जरुरी नाहीं. मला न जाणतां त्रैलोक्याचें जरी ज्ञान झालें, तरी तें अगदीं व्यर्थ आहे; कारण, तें कण सोडून कोंडा पदरीं बांधण्यासारखें आहे. म्हणून मला जाणून तूं दुसरें कांहींहि जाणलें नाहींस तरी तूं सुखी होशील. ” (ज्ञा., ९, ३०७–३४.)

### कर्तव्य म्हणजेच ईश्वरी आज्ञा

यात्रमाणें कर्में करीत असतां अध्यात्म-प्रांतांत कसा प्रवेश मिळेल या-बद्दल कर्ममार्गाच्या दृष्टीनें अनेक साधनें सुचविलीं आहेत. कर्तव्य म्हणून सर्व कर्में करण्याची संवय लावून घेतल्यानें कर्म बंधनकारक होत नाहीं. हें कर्म-बंधनांतून सुटण्याचें पहिलें साधन होय. कर्तव्यनिष्ठा हें कर्ममार्ग न्याय्य असल्याचें पहिलें कारण होय. ज्ञानेश्वरीच्या तिसऱ्या अध्यायांत परमेश्वरानेंच लोकसंग्र-हार्थ कर्म करण्यास प्रथम आज्ञा दिली व हें कर्म वर्णाश्रमाच्या नडीप्रमाणें नियमित केलें असें सांगितलें आहे. तुम्ही आपलें कर्तव्य करा, फळाची आशा धरूं नका. व्रत, नियम करूं नका, तीर्थास जाऊन शरीर कष्टवूं

नका. योगयागादिक सकाम कर्में करूं नका. मंत्रतंत्रादि विधानांच्या भानगडींत पडूं नका, इतर देवतांना भजूं नका. स्वधर्मांत सांगितला असेल तेवढाच यज्ञ करा. पतिव्रता ज्याप्रमाणें आपल्या पतीस भजते, त्याप्रमाणें निष्कामपणें आपल्या देवाची पूजा करा. तुम्ही स्वधर्माला भजाल तर तो तुम्हांस कामधेनु होईल. (ज्ञा., ३, ८५–९४.) याप्रमाणें कर्मबंधनांतून मुक्त होण्यास कर्तव्य म्हणून कर्म करणें हा प्रथम मार्ग होय.

### अनासक्त कर्माचरण

कर्मांत कोणत्याहि प्रकारें न गुंततां कर्म करणें हा कर्मबंधनांतून सुटण्याचा दुसरा मार्ग होय. कर्म करीत असतां शेवटीं त्यांतून नैष्कर्म्यसिद्धि मिळवायची झाल्यास अनासक्ति हा एक उपाय दिसतो. आपल्या अंतःकरणावर कर्तेपणाचा पगडा बसूं न देतां महायागादि कर्में करावीं असें ज्ञानेश्वरांनीं अठराव्या अध्यायांत सांगितलें आहे. पैसे घेऊन यात्रेस गेलेला इसम यात्रेचें फळ आपणास मिळणार असा अभिमान बाळगत नाहीं; समर्थ राजाच्या मुद्रेनें एकादा राजास देखील हांकून लावूं शकेल, पण त्यामुळें आपल्या अंगीं तें सामर्थ्य आहे असा अहंकार त्यास वाटणार नाहीं; दुसऱ्याची कांस धरून पोहणाऱ्याच्या ठायीं आपण पोहतों ही भ्रामक कल्पना राहत नाहीं किंवा यज्ञांत आपण मोठें दानशूर आहों असा अविर्भाव पुरोहित आणीत नाहीं. दाई दुसऱ्याच्या मुलास पोसते त्याप्रमाणें फलाविषयीं निराश असावें. पिंपळाचीं फळें मिळावीं म्हणून कांहीं पिंपळास कोणी पाणी घालीत नाहीं, आपल्यास दूध मिळेल या आशेनें कांहीं गुराखी गुरें राखीत नाहीं. त्याप्रमाणें फळाची आशा न ठेवतां कर्में करावीं. अर्जुना, कर्म व नैष्कर्म्य यांविषयीं हा माझा संदेश आहे असें तूं समज." (ज्ञा., १८, १६६–७६.)

### कर्मफलाचा त्याग

कर्मामध्यें निष्कामतेचें फल मिळवावयाचें झाल्यास कर्मफलाचा पूर्णपणें त्याग करावा हा तिसरा मार्ग. "बुद्धीच्या पाठींपोटीं व कर्माच्या आदीं—

अंतीं मला बांधणें तुला अशक्य असल्यास तूं संयमाचा अवलंब कर व कर्मांच्या फळांचा त्याग कर. झाडांस किंवा वेलींस भलतीं फळें आलीं, तर तीं वाहणें त्यांना असह्य होऊन तीं किंवा त्या तीं खालीं टाकून देतात, त्याप्रमाणें योग्य वेळीं कर्माचीं फळें तूं टाकून दे. हीं कर्में ईश्वर-प्राप्तीसाठीं केलीं नाहींत तरी चालेल; तीं सर्व शून्यांत जाऊं देत. खडकावरील पावसाप्रमाणें, अग्नींत पेरलेल्या बीप्रमाणें किंवा झोंपेंत पाहिलेल्या स्वप्नाप्रमाणें तूं आपलीं सर्व कर्में निरर्थक समज. आपल्या मुलीविषयीं मनुष्य जसा निर्विकार असतो, त्याप्रमाणें सर्व कर्मांविषयीं तूं निष्काम राहा. आकाशांत अग्नीची ज्वाला विरून जाते, त्याप्रमाणें शून्यांत तुझीं सर्व कर्में नाहींशीं होऊं देत. हा फलत्याग, अर्जुना, साधारण वाटतो; परंतु खरोखर तो सर्व योगांत श्रेष्ठ आहे हें लक्षांत ठेव." (ज्ञा., १२, १२५-३४.) परमेश्वरास कर्मफळें अर्पण करण्याची एकाद्याची स्वभावतः प्रवृत्ति नसली तर तीं शून्यांत विरूं द्यावीं असें मत ज्ञानेश्वरांनीं येथें प्रतिपादिलें आहे असें दिसतें.

### कर्मांचें ईश्वरार्पणत्व

कर्मांतून नैष्कर्म्य प्राप्त करून घेण्याचा सर्वांत श्रेष्ठ मार्ग म्हणजे सर्व कर्में ईश्वरास अर्पण करणें हा होय. शून्य किंवा अभाव नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त करून देण्यास अगदीं अपुरा पडतो. म्हणून भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें कर्में ईश्वरास अर्पण करावीं म्हणजेच निष्काम कर्म केल्याचें श्रेय मिळतें असें ज्ञानेश्वरांनींहि प्रतिपादिलें आहे. "केलेलीं सर्व कर्में भक्तिभावानें मला अर्पण करावीं. तीं कर्में केल्याची आठवण सुद्धां मनांत ठेवूं नये. याप्रमाणें कर्में धुऊन माझ्या हातीं दे. अग्निकुंडांत बी टाकली म्हणजे तीस अंकुर फुटत नाहीं, त्याप्रमाणें चांगलीं व वाईट दोन्ही प्रकारचीं कर्में मला अर्पण केलीं म्हणजे त्यांस फल येत नाहीं. कर्में माझ्या हवालीं करतांक्षणीं जन्म-मरण व त्यांचे क्लेश पुसून जातात. तेव्हां अर्जुना, उद्यांची वाट पाहूं नको. या नैष्कर्म्यसिद्धीच्या युक्तीचा तावडतोब उपयोग कर." (ज्ञा., ९, ४००-४०५.) पुनः एके ठिकाणीं ज्ञानेश्वर म्हणतात, "तूं इंद्रियें कोंडूं नको, भोग तोडूं नको, स्व-

धर्माचा अभिमान सोडूं नको. कुलधर्माचें आचरण यथास्थित करावें व सर्व विधिनिषेध पाळावे. या सर्व गोष्टी करण्यास पूर्ण मोकळीक आहे. मात्र हे सर्व व्यवहार कायावाचामनें करीत असतां ' मी हें करीत आहें ' ही भावना सोडून द्यावी. कांहीं करणें किंवा न करणें हें आपल्यावर अवलंबून नसून जो अखिल विश्व चालवितो त्या परमात्म्याकडे आहे. तुझी चित्तवृत्ति अखंड माझ्या ठायीं ठेव. आपण सरळ चाललों आहों कां वांकडें याचा रथ कधीं विचार करतो काय ? आणि जें जें करशील तें तें लहानथोर न म्हणतां शांतपणें मला अर्पण कर. ही सद्भावना अंगीं पूर्णपणें भिनली म्हणजे देह टाकल्यावर तूं माझ्यांत लीन होशील. " (ज्ञा., १२, ११४-२४.) शेवटीं, ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायांत आपल्या स्वकर्म-कुसुमांनीं विश्वात्मक देवाची पूजा करावी असें सांगितलें आहे. अशा पूजेनेंच परमात्म्यास अपार संतोष होतो व तो संतुष्ट झाला म्हणजे आपला प्रसाद म्हणून आपणांस वैराग्यसिद्धि देतो. या तीव्र वैराग्यानें व ईश्वराचा वेध लागल्यानें हें सर्व दृश्य जग वमनवत् त्याज्य वाटतें. आपल्या पतीच्या विरहानें पतिव्रतेला आपल्या जिवाचेंहि ओझें वाटतें, त्याप्रमाणें सर्व सुखें अशा मनुष्यास दुःखरूप होतात व जरी त्यास अंतिम तत्त्वाचें सम्यक्ज्ञान प्राप्त झालें नाहीं, तरी केवळ वेध लागल्यामुळें तो तन्मय होतो; म्हणून या योगाची येवढी महती आहे. " (ज्ञा., १८, ९१६-२२.) याप्रमाणें कर्मांतूनच नैष्कर्म्य प्राप्त करून घेण्याचे चार मार्ग येथें सुचविले आहेत: सामाजिक जबाबदारी म्हणून कर्म करणें हा प्रथम मार्ग; आसक्ति न ठेवतां कर्म करणें हा दुसरा मार्ग; कर्माच्या फलाचा त्याग करणें हा तिसरा मार्ग; व सर्व कर्में ईश्वरास अर्पण करणें हा शेवटचा, चौथा, जास्त विधायक मार्ग होय.

## सत्त्वरजतमोगुणांपासून उद्भवणाऱ्या त्रिविध मनोवृत्ती

सात्त्विक, राजस व तामस या त्रिविध मानसिक प्रवृत्तींच्या आधारें नैतिक मनोधर्मांचेहि सात्त्विक, राजस व तामस असे त्रिविध प्रकार मानतां येतात, हें मत आतां सर्वमान्य झालें आहे. आतां सात्त्विक, राजस व तामस गुणधर्म मनुष्याच्या मनांत कसे उद्भवतात याचें सूक्ष्म पृथक्करणात्मक विवेचन

ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीच्या चौदाव्या अध्यायांत दिलें आहे. तेथें ते म्हणतात : " सत्त्व, रज व तम हे गुण अनादि प्रकृतीच्या भूमिकेपासून निर्माण झाले आहेत. एकाच शरीरांत बाल्य, तारुण्य व वार्धक्य वसतात, त्याप्रमाणें एकाच वृत्तींत हे तीनहि गुण असतात. माशानें गळ गिळण्यापूर्वीच कोळी आपलें जाळें ओढतो, त्याप्रमाणें सत्त्वगुणरूपी पारधी सत्त्वगुणप्रधान मनोवृत्तींच्या लोकांवर ' सुख व ज्ञान '–रूपी आपलें जाळें टाकतो व हरणांस जाळ्यांत पकडावें त्याप्रमाणें त्यांना पकडतो. तेव्हां हे लोक ज्ञानानें शेफारतात, जाणिवेनें चौफेर उड्या मारतात व हातचें आत्मसुख घालवितात. विद्येनें व मानानें हे लोक खुष होतात, अल्पलाभानेंहि संतुष्ट होतात व आपणांस आनंद झाल्याच्या जाणिवेनें आपलीच बेफाम स्तुति करूं लागतात : ' माझें भाग्य फार थोर आहे, माझ्या-इतका सुखी जगांत कोणीच नाहीं ' असें ते बडबडूं लागतात व सात्त्विक गुणांपासून उद्भवणाऱ्या सर्व आठ भावनांनीं त्यांचें अंतःकरण भरून जातें ! येवढ्यावरच ते थांबत नाहींत. त्यांच्या अंगांत विद्वत्तेचें भूत शिरतें व आपण ज्ञानरूप आहों हें विसरून विषयज्ञानाच्या अभिमानानें आपण आकाशापेक्षांहि मोठे आहों असें त्यांना वाटूं लागतें." ( ज्ञा., १४, १३९–१५४. ) राजस मनोवृत्तीचा मनुष्य सदा सुखाच्या शोधांत गुंतलेला असतो व त्याची वासना नेहमीं तरुण असते. अग्नीवर तूप ओतलें तर तो आवांक्याबाहेर जातो, त्याप्रमाणें अशा मनुष्याच्या वासनांना सीमाच राहत नाहीं व त्याला सुवर्णमय मेरुपर्वत मिळाला तरी त्याची हांव वाढतच राहते. आज आपल्याजवळ आहे तें सर्व खर्चून गेलें तर उद्यां काय करावयाचें, या विचारानें तो निरनिराळे व्यवसाय करतो. ' स्वर्गांत गेल्यावर तेथें काय खावयाचें ? ' या विचारानें तो यज्ञ करूं लागतो. ग्रीष्मांतील वाऱ्यास विसांवा नसतो, त्याप्रमाणें याच्या व्यापारास विश्रांति नसते. धांवणाऱ्या वाऱ्याप्रमाणें, कामिनींच्या कटाक्षांप्रमाणें किंवा विजेप्रमाणें तो चंचल असतो. तितक्याच वेगानें तो कर्मांच्या आगींत शिरतो. " ( ज्ञा., १४,१६१–१७२. ) " तामसी प्रवृत्तीच्या मनुष्याचें वर्तन या दोहोंपेक्षां निराळें असतें. तो केवळ गाढ अज्ञानांत राहतो व हें अज्ञान म्हणजे अविवेकाचा महामंत्र, मूर्खपणाच्या दारूचें पात्र व सर्व विश्वास भुलविणारें अस्त्र आहे.

तामस गुण म्हणजे सर्व इंद्रियांचा आळस व मनाचा मूर्खपणा होय. या आळसानें मूर्खपणा वाढतो. असा मनुष्य अंग मोडण्यांत व जांभया देण्यांत आपला सर्व वेळ घालवितो व त्यास कोणतेंहि काम करूं नये असें वाटतें. डोळे उघडे असून तो पाहत नाहीं, हांक न मारतांच झोपेंतून “ओ” म्हणून उठतो व एकदां दगडासारखा पडला कीं आकाश वर कोसळो कीं पृथ्वी रसातळास जावो, उठणें हा भावच त्याच्या मनांत उद्भवत नाहीं! चांगलें-वाईट त्यास कळत नाहीं. आहे तेथें लोळण्यासाठींच जणूं देवानें त्यास बुद्धि दिलेली असते. त्याला निद्रेविषयीं इतकी भयंकर आवड व इच्छा असतात कीं झोंपीं गेला असतां तो स्वर्गाहि तुच्छ लेखतो. ‘मला ब्रह्मदेवाचें दीर्घ आयुष्य मिळूं दे, पण तें सर्व मला निजूनच घालवूं दे’ असें तो म्हणतो. रस्त्यांत चालत असतां तो डुलक्या घेतो व झोंपतो! त्यास अमृताचीहि इच्छा नसते. कोणाशीं कसें वागावें व काय बोलावें हें त्यास कळत नाहीं. आपल्या चिमुकल्या पंखानें माशीनें वडवाग्नि विझवूं पाहावें, त्याप्रमाणें तो निष्कारण धाडसाचीं कर्में करतो, करवत नाहीं त्या कामाविषयीं धैर्य दाखवितो व चुका करणें त्यास आवडतें. सारांश, निद्रा, आलस्य व प्रमाद या तीन दोरखंडांनीं तामसी मनुष्य जखडलेला असतो.” (ज्ञा., १४,१७४-९४.)

### गुणत्रयाचा त्याग

त्रिगुणांचें साम्राज्य ज्यांच्या मनावर आहे त्यांचे साधारण स्वभावधर्म येथवर सांगितले. या गुणांच्या पलीकडे हजारांतून एकादाच जातो. त्यांच्या बंधनांतून सुटणें, आत्मरूपाशीं एक होणें व याप्रमाणें त्रिगुणातीत होणें म्हणजेच खरी मुक्ति होय. निरनिराळ्या सोंगांनीं नट जसा फसत नाहीं, त्याप्रमाणें मनुष्यानें गुणांच्या सामर्थ्यानें फसूं नये. वनांतील वनलक्ष्मीच्या विलासाचें कारण वसंत असतो, त्याप्रमाणें या गुणांच्या विस्ताराचें कारण ईश्वर आहे. तारागण केव्हां मावळतात, सूर्यकांत केव्हां उद्दीप्त होतो, कमळ कसें उमलतें व अंधार कसा नाहींसा होतो, हें जसें सूर्यास दिसत नाहीं, त्याप्रमाणें मी अकर्ता असून सत्तारूपानें या देहांत राहतो, हा बोध किंवा विवेक ज्याच्या

अंतःकरणांत उत्पन्न होतो, तोच या त्रिगुणांपलीकडे जाऊन नदी शेवटीं समुद्रास मिळते त्याप्रमाणें शेवटीं मला येऊन मिळतो. पिंजऱ्यांतील पोपट ज्याप्रमाणें लोखंडी नलिकेवरून उडून स्वतंत्रपणें झाडांच्या फांद्यांवर बसतो, त्याप्रमाणें तो गुणांवरून उडून स्वतंत्रपणें मूळ आत्मरूपावर येतो. जो अज्ञान-निद्रेंत झोंपून बद्बदां घोरत होता, तो पूर्ण जागृत स्वरूपांत जागा होतो. बुद्धिभेदाचा आरसा त्याच्या हातांतून गळून पडतो व त्यास आपलें प्रतिबिंब प्रकृतींत दिसेनासें होतें. देहाभिमानाचा वाहता वारा थांबला व 'जीव आणि ईश'रूपी लहरी व सागर यांचें ऐक्य झालें! कांचेच्या घरांत पेटविलेल्या दिव्याचा प्रकाश जसा बाहेर कधींच फांकल्याशिवाय राहत नाहीं किंवा वडवानळ जसा समुद्राच्या पाण्यानें विझत नाहीं, त्याप्रमाणें त्याचें आत्मज्ञान आल्यागेल्या गुणांनीं मळत नाहीं. तो पाण्यांत न भिजणाऱ्या चंद्रबिंबाप्रमाणें असतो. हे तीनहि गुण आपल्या सामर्थ्यानें देहास बाहुलीप्रमाणें नाचवीत असले तरी तो त्यांत मिसळत नाहीं. आपल्या शरीरांत काय चाललें आहे हें देखील तो जाणत नाहीं. कांत टाकून साप पाताळांत गेल्यावर, त्या कातडी खोळीची फिकीर कोण करील? फुलापासून निघालेला सुवास एकदां आकाशांत विरून गेला म्हणजे तो पुनः फुलाकडे परत येतो काय? त्याप्रमाणें तो एकदां स्वरूपांत समरस होऊन गेल्यावर या देहधर्माचा त्याच्यावर कांहींच परिणाम होत नाहीं. (ज्ञा., १४, २८७–३१५.)

### अश्वत्थ वृक्षाचें (भववृक्षाचें) उन्मूलन

यामप्रमाणें गुणांच्या गुलामगिरींतून मनुष्यास मुक्त होतां येतें. मागें विस्तारानें वर्णन केलेल्या असत्यरूपी अश्वत्थवृक्षाचें उन्मूलन सदाचरणानें कसें करतां येतें याविषयीं सूक्ष्म विवेचन ज्ञानेश्वरांनीं दुसऱ्या एका रूपक-मालेच्या साह्यानें केलें आहे : "या वृक्षाचीं पाळमुळें खणून काढावयास निघालेल्या मनुष्याचें मन वैराग्यपूर्ण बनतें. कुत्रा आपल्या वमनाकडे फिरून पाहत नाहीं त्याप्रमाणें या वैराग्यामुळें तो त्रिगुणांचा त्याग करतो. देहाहंकाराच्या म्यानांतून विवेकखड्ग उपसून तो तें प्रत्यग्बुद्धिरूपी हातांत सहज धरून, विवेकरूपी

दगडावर पाजळतो तेव्हां त्यास ( खड्गास ) 'अहं ब्रह्मास्मि' या ऐक्याची तीक्ष्ण धार येते; त्यास पूर्ण बोधानें स्वच्छ घांसून व निश्चयाचें मुष्टिबळ एक-दोन वेळां पाहून तें शुद्ध अंतःकरणाच्या मनानें पेलावें. मग—निदिध्यासानें हत्यार व आपण एक झाल्यावर—घाव घालण्यास समोर कांहींच विषय राहत नाहीं! या आत्मज्ञानाच्या तलवारीपुढें व अद्वैतबोधाच्या निवाड्यामुळें भव-वृक्ष केव्हांच नाहींसा होतो! मग त्या वृक्षाचीं मुळें स्वर्गाकडे जातात का नरकाकडे, त्याच्या शाखा खालीं वाढतात का वर, हा विचारच राहत नाहीं. चांदण्यांत मृगजळ नाहींसें होतें, त्याप्रमाणें तो वृक्ष आपोआप नाहींसा होतो." (ज्ञा., १५, २५५–६५.)

त्रिगुणांची गुलामगिरी झुगारून देणें, किंवा भववृक्षाचें उन्मूलन करणें हाच ईश्वर-प्राप्तीचा मार्ग होय हें आपण पाहिलें. त्याचप्रमाणें काम, क्रोध व लोभ हे परमार्थ-मार्गावरील मारेकरी असून त्यांचा नाश केल्याशिवाय परमेश्वर-प्राप्ति होत नाहीं असें गीतेप्रमाणें ज्ञानेश्वरांतहि सांगितलें आहे. "हे तिघे जेथें जमतात, तेथें अशुभ पिकतें असें समजावें. सर्व दुःखांचें स्थान गांठणाऱ्यांचे हे वाटाड्ये आहेत. नरकवास भोगावयास लावणाऱ्या पातकांचें हे संमेलनच आहे. पुराणांतरीं वर्णिलेल्या रौरव नांवाच्या नरकाचा विचार करा कशाला? हे मूर्तिमंत रौरव नरक आहेत! नरकाची वाट दाखविणारी त्या नरकाच्या उंबरठ्यावर रोवलेली ही त्रिफळी ( किंवा त्रिशंकु ) आहे! यांच्यामध्यें जो उभा राहतो, त्यास नरकांत मोठा मान मिळतो. हे तीनहि जोंपर्यंत जिवंत व जागृत आहेत, तोंपर्यंत खऱ्या कल्याणाची भाषाच नको! ज्याला आपला नाश होऊं नये व आपलें हित व्हावें असें वाटतें, त्यानें ह्यांच्यापासून सावध राहावें व यांच्या वाटेस जाऊं नये. पाठीं भला मोठा दगड बांधून कोणी जिवंतपणीं समुद्र तरून गेला आहे काय? किंवा काळकूट विष खाऊन कोणी जगला आहे काय? हे तीन ज्यांच्या मनापासून दूर राहिले, त्यांनाच सत्संग लाभतो व मोक्षाचा मार्ग मिळतो. मग सत्संगाच्या जोरावर व सत्शास्त्राच्या सामर्थ्यानें ते जन्म-मरणांचें निबिड अरण्य ओलांडून जातात व गुरुकृपेच्या परमानंदपूर्ण शहरीं पोहोंचतात. तेथें संसाराचा सर्व गलबला नाहींसा होऊन त्यांना पूर्ण आत्मानंद प्राप्त होतो." (ज्ञा., १६, ४२४–४३.)

# ४ साक्षात्कार

## ईश्वरप्राप्तीचा मार्ग

आत्मप्राप्तीच्या मार्गाचें दिग्दर्शन करणें हा सर्व संतांचा अतिशय जिव्हाळ्याचा विषय होय. ज्ञानेश्वरांनीं या मार्गाचें अनेक दृष्टींनीं वर्णन करण्यांत आपली पराकाष्ठा केली आहे. " हा पंथराज अगदीं शेवटपर्यंत कोणीच पांथस्थ चालून जाऊं शकत नाहीं, असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें आहे. सर्वांत मोठे देव श्रीशंकरहि अद्यापि या मार्गावरील प्रवासीच आहेत. योग्यांचे समुदाय आकाशीं या मार्गानें आडवेतिडवे निघाले व ते गेलेली वाटच अनुभवाच्या पावलांमुळें रहदारीचा रस्ता बनली. त्यांनीं बाकीचे आडमार्ग सोडून सरळ आत्मज्ञानाचा राजरस्ता स्वीकारला. त्यानंतर मोठमोठे ऋषी त्यांच्या मागून गेले. प्रथम साधक होते ते हा मार्ग चोखाळून सिद्ध झाले. हा मार्ग पाहतांच साधक तहानभूक विसरतो. या मार्गांत रात्र-दिवस हा भेद राहत नाहीं. या मार्गावर चालत असतां पाऊल पडेल तेथें मोक्षाची खाण सहज उघडते. येथें कोणी आडमार्गास लागला तरी स्वर्ग लाभतो, सरळ पूर्वेकडून निघाला कीं थेट पश्चिमेस जातो. याप्रमाणें या मार्गावरील प्रवास निश्चळ व निश्चित आहे. या मार्गानें चालूं लागलें असतां आपणांस जें गांव गांठावयाचें आहे तें गांव आपणच होतों, हा या मार्गाचा आश्चर्यकारक विशेष आहे. " ( ज्ञा., ६, १५२—६०. )

## पथराजाच्या चार ( Aveunes ) वृक्षराजी

भगवद्गीतेस अनुसरून ज्ञानेश्वरांनीं या पंथराजाच्या चार वृक्षराजी असल्याचें वर्णन दिलें आहे. " सांख्य—दर्शनाचा अवलंब करून कांहीं साधक

ज्ञानमार्गानें जातात व 'विचार'–मुशींत छत्तीस तत्त्वें टाकून शेवटीं बावनकशी शुद्ध आत्मसुवर्ण काढून घेतात; कांहीं जण ध्यानाच्या साह्यानें आपल्यामध्येंच आत्म्यास पाहतात, तर कांहीं जण कर्माच्या आश्रयानें ईश्वरप्राप्ति करून घेण्याचा प्रयत्न करतात. शेवटीं, कांहीं जण आपला अभिमान टाकून दुसऱ्यावर पूर्णपणें विश्वास ठेवतात व त्या विश्वासाच्या जोरावर संसाराच्या अज्ञान–तिमिराचा नाश करतात. ते हिताहित जाणतात व दुसऱ्यांचें दुःख पाहून त्यांचें अंतःकरण दयेनें भरून येतें. ते त्यांचें दुःख निवारतात व त्यांना सुख देतात. विश्वास ठेवलेल्या गुरुजनांच्या मुखांतून जे शब्द येतात त हे साधक फार आदरानें ऐकतात, ऐकून मनानें व शरीरानें तसें वागण्याचा प्रयत्न करतात व त्या शब्दांवरून आपले जीव ओंवाळून टाकतात. हे साधक देखील शेवटीं उत्तम प्रकारें संसारसमुद्र तरून जातात." ( ज्ञा., १३, १०३७–४७. ) ज्ञानयोग, ध्यानयोग व कर्मयोग यांच्या इतकाच भक्तियोग श्रेष्ठ मानला असून, श्रेष्ठ सद्गुरूंच्या उपदेशाप्रमाणें जो वागतो, त्यास इतर मार्गावरील क्लेश न सहन करावे लागतां सहज आत्मज्ञान प्राप्त होतें, असें येथें सांगितलें आहे.

## सर्व आपत्तींत ईश्वराचा शोध

जन्म दुःखमय असल्यामुळें मनुष्यावर कितीहि संकटें कोसळलीं, तरी त्यांतून ईश्वर–प्राप्तीचा मार्ग त्यानें काढावा. वस्तुतः ईश्वराचा शोध केल्यानेंच या जीवनांतील दुःखें नाहींशीं होतील. " शेंकडों भोंकें पडलेल्या नावेंत बसून माणसास निश्चिंती कशी मिळेल ? शस्त्रांचा वर्षाव होत असतां उघडें कसें राहावें ? रोगग्रस्त मनुष्य औषधाविषयीं उदास कसा राहील ? चोहोंकडें वणवा पेटला तर तेथून मनुष्य कसा पळून जाणार नाहीं ? त्याप्रमाणें या दुःखमय जगांत आल्यावर मला न भजून कसें चालेल ? मनुष्यप्राणी माझें भजन करत नाहींत तें कोणत्या जोरावर ? त्यांच्या अंगीं असें काय बळ असतें कीं ते आपल्या घरीं किंवा भोगांत निश्चिंत राहूं शकतील ? त्यांची विद्या किंवा त्यांचें वय याची काय किंमत आहे ? मला न भजतां त्यांना सुख कसें लाभणार ? आयुष्य म्हणजे मृत्युलोकींचा शेवटचा बाजार आहे व येथें आपत्तींचा अनेक

विध माल आला असून तो मृत्यूच्या मापीं लागला आहे. येथें गिऱ्हाइकांस सुख कसें मिळेल ? गार राखुंडी फुंकून दिवा लागेल काय ? विषाचे कांदे वाटून व त्या रसास ‘ अमृत ’ असें नांव देऊन तो रस प्याल्यानें कोणी अमर होईल काय ? त्याप्रमाणें या दुःखमय आयुष्यापासून कोणासहि सुख प्राप्त होणें शक्य नाहीं. या मृत्युलोकीं सुखाची कहाणी कोणीं ऐकिली आहे काय ? इंगळाच्या अंथरुणावर सुखाची झोंप येईल काय ? या मृत्युलोकींचा चंद्र देखील क्षयरोगी आहे व येथें तारेहि मावळण्यासाठीं उगवतात. येथें मंगळाच्या अंकुरास अमंगळाची कीड लागते; उदरांतील गर्भास देखील मृत्यु कोंडतो. जे गेले त्यांच्या मार्गावरील पावलें पाहिलीं, तर परत आल्याची एकहि खूण दिसत नाहीं. येथील पुराण व इतिहास म्हणजे मेलेल्यांच्या एकत्र केलेल्या गोष्टी ! अशा मृत्युलोकांत लोकांनीं निश्चिंत राहावें हें फार आश्चर्यकारक होय! बाळ जसजसें वाढूं लागतें तसतसें हे आनंदानें नाचतात; परंतु वस्तुतः तें मृत्यूकडे ओढलें जातें याची यांना खंतीच वाटत नाहीं ! जन्मल्यावर एकेक दिवस मनुष्य प्राणी मृत्यूच्या जवळ जवळ जात असतो हें ते विसरतात व उल्हासानें गुढ्या उभारतात ! “मरण” हा शब्द सुद्धां त्यांना सहन होत नाहीं आणि कोणी मेला तर त्याच्यासाठीं हे रडतात. परंतु जें आहे तें नष्ट होणार हें मूर्खपणामुळें यांना उमजत नाहीं. साप बेडकास गिळत असतां बेडूक मासा धरूं पाहतो, त्याप्रमाणें कोणत्या लोभानें हें लोक रोज तृष्णा वाढवितात हें कळत नाहीं ! अरेरे ! अर्जुना, तूं जरी दुर्दैवानें या वाईट मृत्युलोकांत जन्मला आहेस, तरी झडझडोन बाहेर नीघ व भक्तीच्या मार्गास लाग, म्हणजे तूं माझ्या अव्यंग अशा निजधामास येशील.” ( ज्ञा., ९, ४९०–५१६. )

## कोणत्याहि दृढ भावनेनें ईश्वरप्राप्ति

मानसशास्त्रदृष्ट्या कोणतीहि तीव्र भावना ईश्वराकडे घेऊन जाऊं शकते असें दिसतें. याप्रमाणें अत्यंत तीव्र प्रेम, भीति किंवा द्वेष यांपैकीं कोणत्याहि भावनेच्या साह्यानें परमेश्वर-प्राप्ति होते, असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहेः “ गोपांच्या स्त्रियांनीं ‘ वल्लभ ’ म्हणून माझें ध्यान केलें व त्या स्वरूपांत

त्या मला येऊन मिळाल्या. कंसाला माझी भयंकर भीति वाटली, तरी तो शेवटीं मला येऊन मिळाला. शिशुपालानें माझा अतिशय द्वेष केला, तरी तो माझ्याशीं एकरूप झालाच ! यादवांनीं बंधु व आप्त म्हणून माझ्यावर प्रेम केलें, वसुदेवानें पुत्र म्हणून माझ्यावर माया केली, नारद, ध्रुव, अक्रूर, शुक व सनत्कुमार यांच्या भक्तींचा मी श्रेष्ठ विषय होऊन राहिलों व ते सव माझ्या स्वरूपांत लीन झाले. अर्जुना, मीच सव भावांचें अंतिम ध्येय आहे व मला भक्ति, वैषयिक प्रेम, वराग्य, द्वेष इत्यादि अनेक मार्गांनीं येऊन मिळतां येतें.” (ज्ञा., ९, ४६५–७०.) देवाविषयीं प्रथम कोणतीहि भावना ठेवली तरी शेवटीं ती तीव्र होतांच ध्येयाशीं म्हणजे परमात्म्याशीं एकरूप होते, हाच वरील विवेचनाचा मथितार्थ आहे.

## दुराचाऱ्यासहि आशा

ज्यांनीं आपलें आयुष्य अत्यंत अधमपणांत व पापकर्मांत घालविलें आहे, त्यांना सुद्धां उत्तम प्रकारचें समाधान तसेंच आश्वासन मिळेल असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे : “पतितांनाहि सुधारण्याची आशा ठेवली आहे. दुराचारी लोकांच्या अंगीं देखील, त्यांनीं फक्त परमेश्वराविषयीं भक्ति बाळगली तर, ईश्वरास जाऊन मिळण्याची योग्यता येते. पापी व पतित साधू होऊं शकतात व होतात, असें ज्ञानेश्वरांनीं स्पष्टपणें सांगितलें आहे. महासागरांत बुडणारा मनुष्य या तीरींच वांचावा, त्याप्रमाणें मनुष्य आधीं जरी दुराचारी असला तरी माझ्यावर त्यानें निष्ठा ठेवली तर तो सर्वांत उत्तम पुरुष बनतो. पराकाष्ठेच्या भक्तीनें नाहीसें होणार नाहीं असें पापच जगांत नाहा. याप्रमाणें पश्चात्तापाच्या तीर्थांत स्नान करून कोणी सर्वभावानें माझ्या मंदिरांत आला, तर त्याचें सर्व कुळ पवित्र होतें व तो कुलशीलवान् व श्रेष्ठ होतो. जन्मास येऊन त्यानेंच आपलें सार्थक केलें, सर्व शास्त्रें तोच पढला व सव तपें त्यानेंच केलीं. अष्टांग-योगाभ्यासहि त्यानेंच केला. माझ्यासाठींच ज्यास अखंड तळमळ लागते, त्यानेंच सर्व कर्में केलीं. मनाचे व बुद्धीचे सर्व व्यवहार एकनिष्ठ भक्तीच्या पेटींत भरून ती पेटी ज्यानें माझ्या स्वाधीन केली, असा भक्त कालांतरानें ईश्वराशीं एकरूप

होईल असें मानणें चुकीचें होईल; कारण, तो आधींच माझ्यांत मिसळून गेलेला असतो. जो अमृतांत राहतो त्यास मृत्यु काय करील? त्याच्या चित्तापुढें माझें रूप सारखें असतें, म्हणून तो तत्त्वतः माझेंच स्वरूप असतो. दिव्यानें दिवा लावल्यावर आधीं कोणता होता व मग कोणता लावला हा भेदच राहत नाहीं, त्याप्रमाणें तो सर्वस्वानें माझी भक्ति करूं लागल्यावर, तो मीच होऊन राहतो व आम्हांमध्यें कांहींच भेद राहत नाहीं." (ज्ञा., ९, ४१८-२८.)

## ईश्वरभक्तींत कुळ नाहीं, जात नाहीं,

ईश्वर-भक्तींत सर्व पापांचा नाश होतो, त्याप्रमाणें तेथें जाति-कुल-भेदांचे विचारहि नाहींसे होतात. "येथें कुळाचें महत्त्व नाहीं. जन्मानें अंत्यज असला तरी चालेल किंवा शरीरानें पशूच्या जन्मास आला तरी हरकत नाहीं. नक्रानें गजेंद्राचा पाय धरल्याबरोबर अत्यंत काकुळतीनें गजेंद्रानें माझें स्मरण केलें, तेव्हां तो मला येऊन मिळाला व त्याचें पशुत्व नष्ट झालें! ज्यांचें नांव घेणें म्हणजे पाप, जे अत्यंत अधमांच्या पोटीं जन्मले, जे व्यसनी, दुर्गुणी व दगडासारखे मूढ व मूर्ख आहेत ते जर दृढपणें व सर्वभावानें माझी भक्ति करतील, जर त्यांच्या तोंडीं माझ्याविषयींच्याच गोष्टी निवतील, जर त्यांची दृष्टि माझेंच रूप पाहील, जर त्यांच्या मनांत माझ्याविषयींच विचार राहतील, जर त्यांचे कान माझ्या कीर्तीशिवाय दुसरें कांहींच ऐकणार नाहींत, माझी सेवा हेंच जर त्यांच्या सर्वांगांचें भूषण बनेल, मीच जर त्यांच्या ज्ञानाचा एकमेव विषय होऊन राहीन, जर त्यांची बुद्धि फक्त मलाच ओळखील, तद्वतच अशा आनंदानें राहणें हेंच जर त्यांचें जीवन बनेल, अन्यथा राहणें जर त्यांना मरणप्राय वाटेल व याप्रमाणें जर आपले सर्व जीव-भाव ते माझ्यांत गुंतवितील, तर ते पापयोनींत जन्मलेले असले व त्यांनीं शास्त्राभ्यास केलेला नसला तरी त्यांना माझ्याशीं तोलून पाहशील, तर, अर्जुना! ते माझ्यापेक्षां यत्किंचितहि कमी भरणार नाहींत असेंच तुला दिसून यईल! चामड्याच्या ज्या तुकड्यावर राजाज्ञेचीं अक्षरें असतील, त्यायोगें बाजारांत वाटेल तें विकत मिळतें. येथें सोनें किंवा चांदी प्रमाण नसून राजाज्ञाच समर्थ आहे.

कारण, राजाज्ञेची मंजुरी मिळाली, तर कातड्याचा तुकडा दखील सोन्याचांदी-पेक्षां जास्त मूल्यवान् ठरतो! जर एकाद्याचीं मन व बुद्धि माझ्या प्रमानें भरून जातील, तर त्यास उत्तमत्व प्राप्त होतें व तोच सवज्ञांत श्रेष्ठ ठरता. म्हणून अर्जुना! येथें जाति, कुल व वर्ण निरर्थक असून माझेंपण म्हणजे माझ्याकडे मन लावणें हेंच एक महत्त्वाचें आहे. म्हणून मनुष्यानें माझ्याकडे वाटेल त्या भावनेनें यावें; तो एकदां माझ्याकडे येऊन माझ्यांत मिसळला, म्हणजे मग बाकी सर्व शून्य व व्यर्थ ठरतें. इतर प्रवाह गंगेंत मिळाले नाहींत तोंपर्यंतच त्यांना ओढा, ओहोळ, प्रवाह अशीं नांवें आम्ही देतों; एकदां गंगेंत मिळाल्यावर ते सर्व पूर्ण गंगारूप होतात. लांकडें अग्नींत टाकलीं नाहींत तोंपर्यंतच खैर, चंदन इत्यादि भेद त्यांच्यांत करतां येतात; एकदां अग्नींत टाकल्यावर तीं सर्व एकरूप होतात व त्यांच्यामधील भेद नाहींसे होतात. त्याप्रमाणें भक्त मला मिळाले नाहींत तोंपर्यंतच त्यांच्यांत क्षत्रिय, वैश्य, स्त्री व शूद्र इत्यादि भेद राहतात; परंतु मला येऊन मिळाल्यावर, मीठ सागरांत विरून एकरूप होतें त्याप्रमाणें ते माझ्याशीं समरस होऊन जातात." (ज्ञा., ९, ४४१–६१.)

## एका भक्तीनेंच ईश्वर-प्राप्ति

ज्ञानेश्वर हेच खरोखर भक्तिमार्गाचे महाराष्ट्रांतील आद्यप्रवर्तक होत व केवळ भक्तीनेंच ईश्वरप्राप्ति होते असें ते सांगतात : "अर्जुना, तेंच तें किती वेळां सांगावयाचें? माझी जर तुला चाड असेल तर माझी भक्ति कर. कुळाच्या मोठेपणाकडे पाहूं नको, कुलीनपणाचा अभिमान बाळगूं नको, विद्वत्तेची व्यर्थ घमेंड वाहूं नको, रूपाच्या अथवा वयाच्या संपन्नत्वानें फुगून जाऊं नको. एक भाव माझ्या ठिकाणीं नसेल तर हें सर्व व्यर्थ आहे. जळो तें माझ्या भक्तीवांचून असलेलें जीवन! अरे, या पृथ्वीवर पाषाण काय कमी आहेत? निंबाचें झाड फळांनीं भरून आलें तरी कावळ्यांसच सुकाळ होतो. खापरांत वाढून पक्वान्नें चव्हाट्यावर ठेवलीं तर तीं कुत्र्यांसच उपयोगीं पडतात! त्याप्रमाणें भक्तिहीन जिणें म्हणजे संसार–दुःखांनीं वाढलेलें ताटच

होय ! ( ज्ञा., ९, ४३०–४४०. ) “ वरून कोसळणाऱ्या पावसास पृथ्वीवर पडण्याशिवाय दुसरी गतीच माहीत नसते किंवा अनन्यगतिक गंगा आपली सर्व जलसंपत्ति घेऊन सागराच्या शोधार्थ निघते व त्यास फिराफिरून मिळते, त्याप्रमाणें आपली भावनारूपी सर्व संपत्ति घेऊन माझा खरा भक्त अखंड प्रेमानें माझ्यांत मिसळून मीच होऊन राहतो. क्षीरसागर ज्याप्रमाणें तीरावर, मध्यें व चोहोंकडे क्षीराचाच असतो, त्याप्रमाणें मुंगीपासून माझ्यापर्यंत सर्व चराचर विश्वांत भक्तीसाठीं माझ्याशिवाय दुसरा विषयच त्यास दिसत नाहीं व तो जाणत नाहीं. ” ( ज्ञा., ११, ६८५–९०. ) भेदांमध्यें अभेद–दर्शन म्हणजेच खरी भक्ति होय, असें ज्ञानेश्वर सांगतात. हें भक्तीच्या तात्त्विक स्वरूपाचें वर्णन असलें, तरी खऱ्या भक्तास या अद्वैताचा आनंद उपभोगलाच पाहिजे हेंहि तितकेंच सत्य आहे : “ जगांत भेद आहेत; परंतु त्यामुळें ज्ञान भिन्न होत नाहीं. शरीराच्या अवयवांत भेद असतात; तरीहि ते सर्व एकाच शरीराचे असतात. लहान–मोठ्या फांद्या एकाच वृक्षावर वाढतात. सूर्याचे किरण अनंत असले तरी सूर्य एकच आहे. त्याप्रमाणें जगांत नानाविध व्यक्ती असल्या, त्यांचीं अनेक नांवें असलीं व त्यांच्या निरनिराळ्या प्रवृत्ती असल्या, तरी या सर्व भेदांमध्यें मी अभेदत्वानें राहतों हें जाणावें. अथवा या ठिकाणीं जें जें दिसेल तें सर्व माझ्याशिवाय निराळें नाहीं असा बोध भक्तास व्हावा हेंच त्याच्या खऱ्या भक्तीचें लक्षण असून ही अद्वैत–भक्ति सर्व भक्तींहून श्रेष्ठ आहे. ( ज्ञा., ९, २५०–६१. )

## संसार व परमार्थ यांतील विरोध

इंद्रियजन्य सुखांचा त्याग करून ईश्वर व त्याचे भक्त यांवर विश्वास ठेवणें ही परमार्थ–मार्गावरील प्रगतीची पहिली पायरी होय. ‘परमार्थाविषयीं खरी जिज्ञासा व आवड माझ्या मनांत उत्पन्न झाल्या नव्हत्या तोंपर्यंत मला संतांबद्दल प्रेम वाटत नव्हतें व त्यांच्या वचनामृताची आवड वाटत नव्हती’ असे उद्गार दहाव्या अध्यायांत अर्जुनानें काढल्याचें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे : “ मागें अनेकदां याप्रमाणें ऋषीश्वरांनीं तुझ्याविषयीं सांगितलें होतें; परंतु देवा ! आतां तुझी कृपा

मजवर झाली म्हणूनच त्यांच्या म्हणण्याचा खरेपणा माझ्या अंतःकरणास पटला. श्रीनारद मुनि माझ्याजवळ येऊन अखंडपणें याच शब्दांनीं तुझी कीर्ति गात असत; परंतु त्यांचा अर्थ न समजतां मी केवळ गीतसुखच उपभोगीत होतों! अंधळ्यांच्या गांवांत सूर्य आपण होऊनच उगवला तरी त्या अंधळ्यांना कोंवळ्या उन्हाचा अनुभव काय मिळणार? त्यांना प्रकाश पाहतां येणार नाहीं. त्याप्रमाणें देवर्षि आत्म्याच्या स्वरूपाविषयीं गात, तेव्हां केवळ बाह्य रागदारी ऐकावयासच मी जात होतों; त्यांतील खोल आध्यात्मिक विचार मीं कधींच समजून घेतले नाहींत. असित व देवल ऋषीहि याप्रमाणेंच तुझे गुण वर्णन करीत; परंतु त्या वेळीं माझी बुद्धि विषय-विषानें व्यापलेली होती. या विषयांचें सामर्थ्य कांहीं विलक्षण आहे! त्यांच्यामुळें जीवांस गोड परमार्थ कडू लागतो व कडू विषय गोड वाटतात! इतरांचें तर राहोच, परंतु प्रत्यक्ष व्यास मुनि आपण स्वतः देवळांत येऊन तुझ्या रूपाविषयीं सदासर्वदा सांगत! तरीहि अंधारांत चिंतामणि पाहून तो न ओळखतां आल्यामुळें टाकावा व दिवस उगवतांच ओळख पटून स्वीकारावा, तसें माझें झालें! कृष्णा, तूं सूर्य मजजवळ नव्हतास म्हणून व्यासादिकांचीं बोलणीं जरी चिद्रत्नांच्या खाणीप्रमाणें अमूल्य होतीं, तरी माझ्याकडून तीं उपेक्षिलीं गेलीं! आतां तुझे शब्द-किरण फांकतांच पूर्वी सर्व ऋषींनीं जे मार्ग सांगितले होते ते सर्व मला स्पष्टपणें दिसूं लागले व त्या सर्वांची नीट ओळख पटली. त्यांचे शब्द म्हणजे खरोखरच ज्ञानाचें बीं होय व तें माझ्या हृदयभूमींत खोल पडलें होतें; परंतु तुझ्या कृपावृष्टीचा ओलावा त्यास मिळाला म्हणूनच त्यास फळें आलीं! मी या तुझ्या संवादसुखाच्या जणूं महासागर बनलों आहें व नारदादि संतांच्या शब्दांचे प्रवाह त्यास मिळाले आहेत. माझ्या वाडवडिलांच्या तोंडून मीं तुझा महिमा ऐकलाच होता; तरीहि माझ्यावर तुझी कृपा झाली नव्हती, म्हणून आजपर्यंत मी तुला जाणूं शकलों नाहीं. भाग्य अनुकूल होतें तेव्हांच मनुष्याच्या प्रयत्नांस यश मिळतें. माळी झाडांस व वेलींस वाटेल तितकें पाणी घालतो; परंतु वसंत येतो तेव्हांच त्यांना फळें लागतात त्याप्रमाणें सर्व शास्त्रें पालथीं घातलीं किंवा

सर्व योगांचा अभ्यास केला, तरी गुरु सानुकूल होऊन कृपा करतील तेव्हांच यश मिळतें." (ज्ञा., १०, १४४–१७२.)

## सद्‌गुरु–कृपा

श्रीसद्‌गुरूंची कृपा शिष्यावर कशी होईल ? यास एकच उपाय आहे, असें ज्ञानेश्वर सांगतात : संतांचीं सर्वस्वानें सेवा करावी. " संत म्हणजे ज्ञानाचें मंदिर होय. त्यांची सेवा म्हणजे त्या मंदिराचा उंबरठा. त्यांचा आश्रय घेऊन मंदिरांत प्रवेश मिळवावा. कायेनें, वाचेनें व मनानें त्यांच्या चरणीं लागावें. अहंकार टाकून त्यांचें सर्व प्रकारें दास्य करावें. म्हणजे आमच्या मनांत काय इच्छा आहे हें ते सांगतील. त्यांनीं बोध केला म्हणजे आमच्या मनांतील सर्व संकल्प नाहींसे होतील. त्यांच्या शब्दांच्या प्रकाशानें आमचें चित्त बलवान् होईल. आमचे संशय नाहींसे होतील तेव्हां सर्व प्राणिमात्र आपल्यासह परमेश्वरांत एकरूप होऊन राहिलेले आम्हांस दिसून येतील, मोहांधकार नाहींसा होईल, ज्ञानप्रकाश उजाडेल व श्रीगुरु कृपा करतील." (ज्ञा., ४, १६५–७१.)

## योग्य वेळीं श्रीसद्‌गुरूंचें दर्शन

सद्‌गुरु योग्य वेळ आली कीं भेटतात असें ज्ञानेश्वरांनीं एके ठिकाणीं सांगितलें आहे. आम्हीं आपली तयारी करावी, कीं सद्‌गुरु आम्हांस हुडकत येतील. " पुत्र, वित्त व बायको म्हणजे एक विषाचें भांडें आहे असें मानावें; इंद्रिय–विषयानें मन संतप्त झालें म्हणजे तें अंतर्मुख होतें व अंतःकरणांतील खोल जागीं जाऊन बसतें. अशा वेळीं मनुष्य आपल्या मनास प्रत्यक्ष आत्म्याचें ध्यान करावयास लावूं लागतो. बाकी राहिलेलीं कर्में संपलीं व नवीन आरंभ केलेल्या कर्मांस फळ येणें बंद झालें, अशा कर्मदशेच्या साम्यावस्थेंत श्रीगुरु आपोआप भेटतात. रात्रीचे चार प्रहर संपले कीं प्रत्यक्ष सूर्य आपल्या नजरेस पडतो. प्रकाशानें अंधार नाहींसा होतो, त्याप्रमाणें गुरुकृपेनें अज्ञान–तिमिर नाहींसें होतें. ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता ही त्रिपुटी ज्ञानांत नाहींशी होते. तोंडासमोरील आरसा काढला म्हणजे पाहणारा जसा न पाहतां राहतो, त्याप्रमाणें नैष्कर्म्य

प्राप्त होतें. ही परमसिद्धि होय. श्रीगुरु कृपा करतील तेव्हांच ही मिळते. गुरु-कृपेचे शब्द कानीं पडतांच ज्यांची सर्व माया नाहींशी झाली असा मनुष्य विरळा ! त्याच्या शब्दानें आत्मसिद्धि प्राप्त होते." (ज्ञा., १८, ९५८–९९१.)

**नाममहिमा**

ईश्वराशीं ऐक्य प्राप्त करून घ्यावयाचें झाल्यास त्याचें नाम व कीर्तन हें एकच साधन भक्तिसंप्रदायाच्या सर्व प्रवर्तकांनीं सांगितलें आहे : "या कीर्तनाच्या उत्कर्षाच्या योगानें त्यांनीं जगांत प्रायश्चित्ताची जरुरीच नाहीं असें केलें, पापास जगाबाहेर घालविलें, यम व दम यांना अवकळा आणली, तीर्थ–क्षेत्रें निरुपयोगी केलीं व यमलोकची रहदारी एकदम थांबविली. यमानें आतां कोणाला ताब्यांत ठेवावें ? संयमानें कोणाचा संयम करावा ? 'दोष औषधासहि राहिला नाहीं, तेव्हां आम्हीं दोष काय नाहींसे करावे ?' असें तीर्थें म्हणूं लागलीं ! याप्रमाणें त्यांनीं माझ्या नामघोषानें विश्वांतलीं सर्व दुःखें नाहींशीं केलीं, सर्व जगच परमानंदानें दुमदुमून भरून टाकलें. ते पहांटेवीण पाहावयास लावतात, अमृताशिवाय नवजीवन निर्माण करतात, योगाभ्यासाच्या दगदगी-शिवायच ईश्वराचें दर्शन घडवितात, राजांना व रंकांना, तसेंच लहानांना व मोठ्यांना समान लेखतात व एकदम सर्व जग आनंदानें भरून टाकतात ! हजारों मनुष्यांपैकीं एकादाच मरणानंतर वैकुंठास जात असेल; पण त्यांनीं तर तिन्ही लोकच वैकुंठ केले ! माझ्या नामघोषानें त्यांनीं हें सर्व जग शुभ्र व पापरहित केलें. तेजानें ते सूर्यापेक्षां जास्त तेजस्वी आहेत, कारण, सूर्य मावळतो; पण त्यांचें तेज कधींच कमी होत नाहीं. चंद्र एकादे वेळींच पूर्ण असतो, तर हे सदा पूर्ण असतात. मेघ उदार असतो; पण तो सरतो, म्हणून तो उपमेस उणा पडतो. ते सिंहाप्रमाणें निःशंक व कृपाळू असतात. त्यांच्या जिव्हेवर माझें नांव मोठ्या आवडीनें अखंड नाचत असतें. हजारों जन्म वायां घालवावे तेव्हां कोठें सुदैवानें एक वेळ नामाचा उच्चार घडतो. मी वैकुंठीं नसतों; एकादे वेळीं मी सूर्य–बिंबावरहि दिसणार नाहीं; योग्यांचीं मनें देखील मी ओलांडून जातों. मी कोठें हरवलोंच, तर जे माझा नामघोष करतात त्यांच्यापुढें मी नेहमीं

असतों व म्हणून तेथें मी हटकून सांपडतों. ते माझ्या गुणांमध्यें इतके तल्लीन होतात कीं, त्यांना देश-काळांचा विसर पडतो व ते आपल्या कीर्तन-सुखांतच रमून जातात." ( ज्ञा., ९, १९७-२०१. )

## परमार्थांत अभ्यासाचें महत्त्व

ईश्वराच्या नामस्मरणाच्या भरीला योगांतील कांहीं साधनें घालावयाची असा एक ईश्वरप्राप्तीचा किंचित् मिश्र व निराळा मार्ग परमार्थांत आहे. राजयोग योग्य रीतीनें आचरला तर तो भक्ति-मार्गाशीं मुळींच विरोधक होत नाहीं. परंतु हटयोग मात्र या दोहोंहून स्वतंत्र व भिन्न आहे. " या योगाच्या अभ्यासानें तूं आपलें मन बळकट कर. योग्य साधनांचा अवलंब केल्यास पांगळ्यास देखील पर्वत ओलांडून जातां येईल. शरीर राहो अथवा जावो, चांगल्या अभ्यासानें तुझें मन तूं निरंतर परमात्मप्राप्तीच्या मार्गास लाव, म्हणजे नाना प्रकारची गति देणारें तुझें मन आत्मरायास वरील व देह गेला किंवा राहिला याची आठवण देखील तुला राहणार नाहीं. ( ज्ञा., ८, ८१-८३. ) अशा प्रकारच्या योगाभ्यासानें आपलें मन हळूहळू ईश्वराकडे लागतें हा योगांतील महत्त्वाचा भाग होय. " मन-बुद्धींसहित तुझें चित्त तुला माझ्याकडे एकदम सर्वस्वीं लावतां येत नसेल, तर आठ प्रहरांपैकीं कांहीं क्षण तरी माझें ध्यान कर. माझ्या ध्यानांत घालविलेला प्रत्येक क्षण तुझ्या मनास विषयसुखापासून दूर नेईल व मग शरत्कालांत नदीचा प्रवाह क्षीण होऊं लागतो त्याप्रमाणें तुझें चित्त संसार-बंधनांतून मुक्त होईल. आणि पौर्णिमेनंतर चंद्रबिंब ज्याप्रमाणें रोज कमी कमी होत जाऊन अमावास्येच्या दिवशीं पूर्ण नाहींसें होतें, त्याप्रमाणें तुझें चित्त विषयभोगांतून हळूहळू निघून माझ्यांत शिरूं लागून शेवटीं सर्वस्वी मद्रूप होईल. अभ्यास-योग म्हणतात तो हाच. यास अशक्य असें कांहींच नाहीं. याच्या बळानें कांहीं लोक आकाशांत हिंडूं लागले, तर कांहींनीं सिंह व साप अशा हिंस्र व विषारी प्राण्यांस निरुपद्रवी केलें. कांहींनीं विषहि पचविलें, कांहीं समुद्रांतून पायीं चालून गेले व कांहींनीं वेद मुखोद्गत केले. या अभ्यास-योगास दुष्कर असें कांहींच नाहीं. म्हणून अर्जुना, या अभ्यासानें तूं माझ्यांत मिसळून एकरूप होऊन जा." ( ज्ञा., १२, १०४-१२. )

## अभ्यासास योग्य स्थान

यानंतर ध्यानास योग्य स्थान कसें असावें याचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं दिलें आहे : "त्या ठिकाणीं बसल्याबरोबर समाधानाची आवड वाढते व तेथून उठूंच नये असे वाटतें. तें ठिकाण पाहिल्यानें वैराग्य दुणावतें. त्या ठिकाणीं संतांनीं ईश्वर–प्राप्तीसाठीं ध्यान केललें असावें. तेथें संतोष वाढावा व धैर्यास आणि उत्साहास मदत व्हावी. त्या जागेवरून सहज गेलें असतां अज्ञेयवादी व नास्तिक यांनाहि तेथें साधनास बसण्याची इच्छा व्हावी. जें मन सदैव भ्रमतें तेंहि तेथें स्थिर व्हावें व विरक्ति झोपीं गेली असली तर तें स्थान नुसतें पाहिल्यानें ती खडबडून जागी व्हावी! राजे लोकांनाहि आपलें राज्य सोडून येथें शांतपणं तपश्चर्या करावी असा मोह उत्पन्न व्हावा. हें स्थान पाहतांच विषयी लोकांनीं आपली विषया-वरील आसक्ति टाकून द्यावी. तेथें अनेक योगी योगाभ्यासाकरितां एकत्र आलेले असावे. तेथें लोकांची वर्दळ नसावी. तेथें झाडांची गर्दी असावीं व फळझाडांना बाराहि महिने मुळापर्यंत अमृताप्रमाणें गोड फळें लागत असावी. पावसाळा नसला तरी तेथें पावलोपावलीं स्वच्छ पाणी उपलब्ध असावें व विशेषत: पाण्याचे झरे सुलभ असावे. वारा निश्चल असावा किंवा फार तर मंद वाहत असावा. सूर्याचा प्रकाश थंड वाटावा. तें स्थान अत्यंत शांत व नि:शब्द असावें. तेथें उग्र पशूंची वस्ती नसावी. तेथें पोपट नसावे, मधमाश्या नसाव्या. पाण्याच्या आश्रयानें असलेले दोन–चार हंस वा चक्रवाक पक्षी असले वा एकादे वेळीं एकादी कोकिळा येऊन बसली तर चालेल. निरंतर वास न करतां मधूनच कांहीं मोर आले व गेले, तर त्यांना आमचा मज्जाव नाहीं. तेथें एकादा मठ किंवा एकादें शिवमंदिर पाहून त्यांत ध्यानास बसावें." (ज्ञा., ६, १६३–१७९.)

## कुंडलिनीचें उत्थान व अनाहत नाद

अशा जागीं ध्यानास बसल्यावर कुंडलिनीचें उत्थान होणें हें योगाभ्यास यशस्वी झाल्याचें प्रथम चिन्ह होय. कुंडलिनी जागृत होऊन अंत:करण भारून टाकते, तेव्हां अनाहत नाद ऐकूं येऊं लागतो. कुंडलिनी हा नाद किंचित् ऐकूं लागते. नादाची गर्जना होऊं लागली कीं प्रणवाचीं व नादचित्राचीं सुंदर रूपडीं

दिसूं लागतात. या ज्ञानास ज्ञाता व ज्ञेय यांची अपेक्षा नसते या ध्यान-स्थितींत ज्ञाता ज्ञेयाहून भिन्न कसा राहील ? मग हें गर्जतें तें काय ? अर्जुना, मी तुला सांगावयास विसरलों कीं, ज्याअर्थी वाऱ्यास नाश नाहीं, त्याअर्थी सर्व गगनासच जणूं वाचा फुटून तें घुमूं लागतें ! त्या अनाहत नादानें दिशा भरून जातात व ब्रह्मरंध्राचें कपाट आपोआप उघडतें ! ( ज्ञा., ६, २७४-७९. )

### योगमार्गावरील अडचणी

भक्तीचा लवलेश अंगीं नसतां हठयोगानें जो ईश्वरप्राप्तीचा प्रयत्न करतो, त्याचा मार्ग किती कठिण आहे याची ज्ञानेश्वरांना पूर्ण कल्पना आहे. अशा माणसाची स्थिति भक्ति-मार्ग चोखाळणाऱ्या माणसापेक्षां किती भिन्न आहे याचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं बाराव्या अध्यायांत दिलें आहे : "सर्व प्राणिमात्रांच्या कल्याणाकरतां जे अव्यक्त व शुद्ध ब्रह्माची प्राप्ति व्हावी म्हणून प्रयत्न करतात, त्यांच्या अंतःकरणांत भक्तीचा लवलेशहि नसतो; त्यांच्या मार्गांत ऋद्धिसिद्धींचे अडथळे येतात; इंद्रपदप्राप्तिरूपी वाटमाऱ्ये त्यांना लुबाडतात. तहानेनें तहानच प्यावी, भुकेनें भूकच खावी, अहोरात्र हाताच्या वावांनीं वारा मापावा, शीत वेढावें, उष्ण पांघरावें किंवा प्रत्यक्ष पावसाच्या घरांत जाऊन राहावें त्याप्रमाणें हा योगाभ्यास म्हणजे प्रताराविण रोज नवा अग्निप्रवेशच होय ! म्हणून हा मार्ग आक्रमणाऱ्यांना दुःखाशिवाय कांहींच लाभत नाहीं. दांत पडलेल्यानें लोखंडाचे चणे खाल्ले तर तो जगेल का मरेल, सांग पाहूं ? पांगळ्यानें वेगाच्या बाबतींत वाऱ्याशीं स्पर्धा करूं नये, त्याप्रमाणें देह धारण केलेल्यांनीं अव्यक्त मिळविण्याची आशा धरूं नये. तरी देखील ते आकाशाशीं मोठ्या धाडसानें कुस्ती खेळूं लागले, तर त्या लोकांस अनंत क्लेश मात्र होतील. परंतु जे भक्तिमार्गानें जातात त्यांना या प्रकारची व्यथा भोगावी लागत नाहीं." ( ज्ञा., १२, ६०-७५. )

### ईश्वराचें सर्वगत ध्यान

भक्तानें आपल्या आंत-बाहेर सर्वत्र परमेश्वरासच पाहावें : " म्हणून तूं सदा माझें स्मरण करावें. जें डोळ्यांनीं पाहतोस, कानानें ऐकतोस, मनानें चिंति-

तोस, वाचेनें बोलतोस, तें अंतर्बाह्य सर्व तूं मद्रूप करून टाकावें म्हणजे सर्व काळीं व सर्वत्र मी एकटाच आहें हें तुझ्या अनुभवास येईल. ही स्थिति प्राप्त झाल्यावर, देह पडला तरी मनुष्य मरत नाहीं. मग तुला लढाई करण्यास भीति कां वाटावी ? तूं मन व बुद्धि मला खरोखर अर्पण करशील, तर तूं मलाच येऊन मिळशील हें मी शपथेवर सांगतों. असें होईल किंवा नाहीं याबद्दल तुला संशय वाटत असेल, तर त्याचा अभ्यास करून पाहा व तुला यश आलें नाहीं, तर खुशाल माझें सांगणें खोटें आहे असें म्हण." (ज्ञा., ८, ७५-८०.) देव सर्व मानसिक अवस्थांशीं एकरूप आहे, त्याचप्रमाणें तो सर्व बाह्य वस्तूंशीं देखील एकरूप आहे; अर्जुनानें विश्वरूप पाहिलें तेव्हां त्यास बाहेर सर्वत्र देव दिसला नाहीं काय ? 'तू नाहींस असें स्थान कोठें आहे तें सांग !' असें अर्जुनानें देवास विचारलें. 'तूं जसा आहेस तशा तुला माझा नमस्कार असो !' अशा प्रकारें देवाची पुनः पुनः स्तुति करून त्यास अर्जुनानें प्रणाम केले व तो म्हणाला, "प्रभो, तुला नमस्कार असोत, नमस्कार असोत !" पुनः देवाच्या रूपाकडे त्यानें न्याहाळून पाहिलें व तो "नमस्ते, नमस्ते" म्हणाला. परमात्म्याच्या रूपाकडे शेवटपर्यंत पाहून त्याचें अंतःकरण आनंदानें भरून आलें व तो पुनः म्हणाला, "प्रभो, नमस्ते, नमस्ते !" या सर्व चराचर विश्वामध्यें परमात्म्यास पाहिलें त्यानें व तो म्हणाला, "प्रभो, नमस्ते, नमस्ते !" त्यास स्तुति करण्यास कांहींच शब्द आठवेनात व स्तब्धहि राहवेना. तो प्रेमानें भरून गेला व आनंदाच्या भरांत "सन्मुखा, तुला सहस्र नमस्कार असोत !" असे उद्गार त्याच्या तोंडून सहज निघाले. "देवास पाठ व पोट आहेत किंवा नाहीं, आगा-पिछा आहे किंवा नाहीं, याचा विचार करून आम्हांस काय उपयोग ? स्वामी, तुला पाठमोराहि माझा नमस्कार असो ! तूं माझ्या पाठीमागेंहि माझें रक्षण करण्यास उभा आहेस, म्हणूनच तुला पाठमोरा म्हणावयाचें ! नाहीं तर मागें व पुढें हा भेदच तुझ्यांत संभवत नाहीं. तुझ्या सर्व अवयवांचें वर्णन करण्यास मी पूर्ण असमर्थ आहें. म्हणून 'तूं सर्वात्मक आहेस' असें म्हणून, हे प्रभो, तुला मी सर्वभावें नमस्कार करतों !" (ज्ञा., ११, ५१९-३२.)

## आत्मा तेजरूप आहे

परमात्मा ज्या अनेक रूपांनीं प्रकट होतो त्यांत तेज हें एक प्रमुख रूप आहे असें दिसतें : " तें आत्मतेज गगनाहून जुनें आणि परमाणूहून लहान व सूक्ष्म आहे; त्याच्या सान्निध्यानें हें विश्व चळतें, त्यापासून या सर्व विश्वाची उत्पत्ति होते व त्यामुळें हें सर्व विश्व जिवंत राहतें. तें तर्काच्या व ध्यानाच्या पलीकडे आहे. चर्मचक्षूंस तें भर दिवसां सुद्धां अंधेराप्रमाणें आहे. कारण, विस्तवाला वाळवी लागत नाहीं व प्रकाशांत अंधार शिरू शकत नाहीं. परंतु ज्ञान्यांस तें अत्यंत तेजस्वी सूर्य किरणांची जणूं राशीच असून तेथें अस्तमानाचें नांवहि नाहीं असा नित्य उदय आहे. " असें या आत्मतेजाचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं दिलें आहे. ( ज्ञा., ८, ८७-९० ) देव कापराची दिव्य दिवटी हातांत घेऊन तत्त्वज्ञानानें शुद्ध झालेल्या ज्ञान्यांस परमार्थ-मार्ग दाखविणारा दिवट्या बनतो, असें ज्ञानेश्वर म्हणतात : " त्यांच्या डोळ्यांपुढील अज्ञान-अंधार नाहींसा करून परमात्मा त्यांच्यापुढें शाश्वत उदय-प्रकाशाच्या रूपानें तळपतो ! ( ज्ञा., १०, १४१-४३. ) आत्म्याच्या या अनंत तेजाचें वर्णन याप्रमाणेंच अकराव्या अध्यायांतहि दिलें आहे : " परमात्म्याच्या अंगांचें तेज इतकें आश्चर्यकारक आहे कीं त्याचें वर्णन करणेंच अशक्य आहे. प्रलयकालीं बाराहि प्रचंड सूर्यांचा मेळावा एकत्र झाला असतां त्यांचें तेज असह्य व्हावें तसें तें असतें. हजारों सूर्य एकदम आकाशांत उगवले असते तरी या आत्म्याच्या अनंत तेजाची सर त्यांना मुळींच आली नसती. सर्व विजा एकत्र जमविल्या, प्रलयाग्नीची सर्व सामग्री एकत्र आणली किंवा दहाहि महातेजें एकत्र मिळविलीं तरीहि सर्व मिळून देखील त्या परमात्म्याच्या तेजाच्या बरोबरीस मुळींच येणार नाहींत ! असें तें श्रीहरीचें सहज व महत् तेज चोहोंकडे तळपत होतें व तें मला मुनिश्रेष्ठांच्या कृपेनें पाहावयास मिळालें. " ( ज्ञा. ११, २३७-४१. ) हें शेवटचें विधान संजयाच्या मुखीं घातलेलें असलें तरी तो प्रत्यक्ष ज्ञानेश्वरांचाच आत्मानुभव असेल काय ?

## अंतर्बाह्य आत्मदर्शन

अर्जुनानें विश्वरूप पाहिलें तेव्हां परमात्मा आत्मज्ञापुढें कोणत्या रूपानें प्रकट होतो याचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं केलें आहे : "ईश्वराचें प्रत्येक गंभीर व सुंदर स्वरूप पाहून अर्जुनाचें मन भांबावून गेलें व ईश्वर उभा आहे कीं बसलेला आहे कीं निजलेला आहे हें त्यास समजेना. त्यानें डोळे उघडून पाहिलें तेव्हां त्याला सर्व बाह्य विश्व ईश्वरी रूपानें भरलेलें दिसलें त्यानें डोळे मिटले तेव्हां आंतहि त्यास तेंच दृश्य दिसलें ! समोर अनंत मुखें दिसूं लागलीं म्हणून त्यानें मागें वळून पाहिलें तरी चोहोंकडे तींच मुखें (व तेच करचरण) त्याला दिसूं लागलीं ! ईश्वराकडे पाहिलें असतां त्याचें रूप दृष्टीस पडावें यांत आश्चर्य कांहींच नाहीं. त्याच्याकडे न पाहतांहि त्याचें रूप दिसतें हें मात्र महदाश्चर्य होय ! वस्तुतः अर्जुनावर कृपा करून नारायणच त्याचें पाहणें व न पाहणें व्यापून आपणच सर्व झाला ! म्हणून आश्चर्याच्या एका पुरांतून तीरावर येतांच अर्जुन पुनः आश्चर्याच्या दुसऱ्या महासागरांत पडला ! कारण, श्रीकृष्णानें अर्जुनास जी दिव्य दृष्टि दिली होती, तिला सूर्याच्या किंवा दिव्याच्या प्रकाशांत वस्तू दिसाव्या व डोळे मिटल्यानें त्या दिसेनाश्या व्हाव्या अशी मर्यादा नव्हती." (ज्ञा., ११, २२६–३४.) अर्जुनाच्या दृष्टीस स्वर्ग–पाताळ किंवा भूमि–अंतराळ हा भेद राहिला नाहीं. सर्व विश्वच ईश्वरमय झालें ! व पुढील उद्गार त्याच्या तोंडांतून सहज बाहेर पडले : "देवा, तूं कोठून आलास ? तूं बसला आहेस, का उभा आहेस ? कोणत्या मायेच्या पोटीं तूं होतास ? तुझी आकृति केवढी ? तुझें रूप, कसें व वय किती आहे ? तुझ्या पलीकडे काय आहे ? तूं कशावर उभा आहेस ? याचा विचार केला तेव्हां तूंच सर्व आहेस, तूंच तुझा आधार आहेस व तूं कोणाचाहि नसून अनादि व अनंत आहेस, तूं उंच किंवा नीचहि नाहींस, उभा किंवा बसलेलाहि नाहींस, तुझ्या खालीं व वर तूंच आहेस व हें अवघें तूंच आहेस असा अनुभव उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत मला आला." (ज्ञा., ११, २७१–७९.)

## साक्षात्कार

साधकास आत्मसाक्षात्कार कसा घडतो याचें ज्ञानेश्वरांनीं एके ठिकाणीं सुंदर वर्णन केलें आहे. हें वर्णन अकराव्या अध्यायांत दिलेल्या विश्वरूपाच्या वर्णनापेक्षां जरा निराळें असणें स्वाभाविक आहे. कारण, अकराव्या अध्यायाचा विषयच विश्वरूप-दर्शन असून, आतां आम्ही देणार आहों तो पंधराव्या अध्यायाचा विषय आत्मदर्शन हा आहे. “ आत्मज्ञानाच्या खड्गानें भवाश्वत्थाचें वर वाढणारें मूळ छेदून टाकल्यावर आपलें रूप आपणांस पाहावयास मिळतें; परंतु हें आरशांत आपलें प्रतिबिंब पाहण्याप्रमाणें मात्र नसतें. कारण, आरशांतील प्रतिबिंब म्हणजे पाहणाऱ्या मनुष्याचेंच दुसरें रूप होय. आत्मदर्शन जिवंत झऱ्यासारखें आहे. तो झरा विहिरींत लागला नाहीं तरी आपल्यांतच परिपूर्ण असतो. पाणी आटल्यावर प्रतिबिंब मूळ बिंबांत मिळतें, घट फुटला कीं घटाकाश महदाकाशांत मिळतें, लांकूड जळल्यावर अग्नि मूळ रूपास परत येतो, त्याप्रमाणें आपण आपलें रूप पाहावयाचें असतें. तें न पाहतां पाहावें व न जाणतां जाणावें. ज्यापासून हें सर्व विश्व निर्माण झालें त्यासच आदिपुरुष म्हणावें. या मूळ पुरुषास पाहावें या उद्देशानें, आयुष्याचा तिटकारा येऊन व ध्येय गांठल्याशिवाय पुनः परत यावयाचें नाहीं या दृढ निश्चयानें खरे ममुक्षू योगमार्गानें गेले. त्यांनीं आपला अहंभाव टाकून दिला आणि ते मूळ घरास आले. जसें थंडीनेंच थंडीमुळें कुडकुडावें किंवा बर्फानेंच बर्फ बनावें, त्याप्रमाणें ही आत्मवस्तु आपणच आपल्यासाठीं व आपल्यांतच राहते. येथें एकदां आल्यावर पुनः परतणें नाहीं.” ( ज्ञा., १५, २६६-८३. )

## सुखाचें शिखर

ज्यानें आत्मानंद उपभोगिला त्याची विषयसुखाची इच्छा आपोआप नाहींशी होते, असें ज्ञानेश्वर वारंवार सांगतात : “आत्मरत ज्ञानी पुरुषाच्या सर्व विषयवासना नष्ट होतात व तो फिरून विषयसुखाकडे ढुंकून सुद्धां पाहत नाहीं, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. त्याचें अंतःकरण आत्मसुखानें भरून गेलेलें असतें; म्हणून तो बाहेर विषयसुखाकडे पाऊलहि टाकत नाहीं. अर्जुना, कमळाचीं

कोंवळीं पानें खाणारा व चंद्राचीं शुभ्र व थंड किरणें पिणारा चकोर पक्षी वाळवंटांतील वाळू कधीं चुंबील का, सांग पाहूं ? त्याप्रमाणें ज्याला उत्कृष्ट आत्मसुख सहज प्राप्त झालें, त्यानें सर्व विषय सहज सांडावे यांत काय नवल आहे ! " (ज्ञा., ५, १०५–१०८.) हीच कल्पना पुन: बाराव्या अध्यायांत ज्ञानेश्वरांनीं मांडली आहे. आत्मसुखास जगांत दुसरी तोड नाहीं; म्हणून आत्मज्ञास विषयसुखाची लालसा राहत नाहीं असें तेथें म्हटलें आहे : " तो आपणच विश्वरूप झाल्यामुळें त्याचा सर्व भेदभाव नाहींसा होतो. त्याचप्रमाणें त्याचे सर्व द्वेषभावहि नाहींसे होतात. जें वस्तुत: आपलें आहे तें म्हणजे आत्मज्ञान होय. तें कल्पांतींहि नाहींसें होत नाहीं याची त्यास पूर्ण जाणीव असल्यामुळें व आपल्याबाहेर कांहींच नाहीं व आपल्यांतच सर्व सांठवलेलें आहे या ज्ञानामुळें, तो गेल्याचा शोक करीत नाहीं व कशाचीहि आकांक्षा बाळगीत नाहीं. तो मूर्तिमंत आत्मज्ञानच होऊन राहतो. त्यांत त्यानें जर माझी भक्ति केली, तर त्याच्यासारखा प्रिय मला या जगांत दुसरा कोणीहि नाहीं हें हे अर्जुना, तुला मी शपथेवर सांगतों." (ज्ञा., १२, १९०–९६.) तो अंतरींच्या महासुखांत इतका तल्लीन झालेला असतो कीं, ऋद्धी व सिद्धी आल्या वा गेल्या तरी त्याची त्यास फिकीर नसते. तो आपल्या आत्म्याच्या सुंदर राजमंदिरांत राहत असल्यामुळें इंद्रभुवनहि तुच्छ मानतो; मग तो भिल्लाच्या मोडक्या झोंपडीनें कसा संतुष्ट होईल ? जो अमृताला नांवें ठेवतो तो कांजी सेवील काय ? अर्जुना, याचप्रमाणें जो आत्मसुखाचा आनंद उपभोगतो तो ऋद्धीचा भोग घेणार नाहीं. याप्रमाणें आत्मानंदानें जो संतुष्ट होतो व परमानंदानें पुष्ट होतो, जो सर्व अहंकार टाकून व सर्व कामवासना सोडून स्वत:च सर्व विश्व होऊन विश्वांत राहतो, तोच खरोखर श्रेष्ठ स्थितप्रज्ञ होय असें तूं जाण." (ज्ञा., २, २९२–९७.) शेवटीं, अर्जुनाच्या मुखानें ज्ञानेश्वरांनीं आत्मप्राप्तीच्या परमानंदाचें वर्णन केलें आहे : " या परमानंदाशीं तुलना केली असतां देवांनीं समुद्र–मंथन करून जें अमृत काढलें त्यास अमृत हें खोटें नांव पडलें असें वाटतें. परंतु तें अल्प व नाशवंत अमृतहि जर इतकें गोड असतें, तर आत्मानंदरूपी परमामृत किती गोड असेल बरें ? तें परमामृत मिळविण्या-

साठीं मंदार पर्वताची रवी वेऊन समुद्राचें मंथन करण्याची जरुरी नाहीं. तें अनादि व स्वयंसिद्ध असल्यामुळें साधकास योग्य वेळीं सहज प्राप्त होतें. तें परिणामीं इतकें जबरदस्त, उपकारक व समर्थ असतें कीं, त्याविषयीं नुसतें ऐकल्यानेंहि संसाराचा नाश होतो, अविनाशित्व बळेंच अंगीं लागतें, जन्म-मृत्यूंची भाषा निःशेष हरपून जाते, आंत व बाहेर महासुख वाढूंच लागतें आणि वर देवाचें सान्निध्य घडतें व त्याचे आनंदपूर्ण गोड शब्द ऐकावयास मिळतात!" (ज्ञा., १०, १९२-२००.) साधकास मिळणाऱ्या आनंदाची ही परिसीमा होय.

## अनुभूतीचे शरीरावर होणारे परिणाम

साधकास प्राप्त होणाऱ्या परमानंदाची येथवर चर्चा झाली. आतां ईश्वरी साक्षात्काराचे साधकाच्या शरीरावर, मनावर व आचरणावर काय परिणाम होतात याचा विचार केला पाहिजे. या विविध परिणामांचा विचार करीत असतां प्रथम शारीरिक परिणामांची माहिती देणें जरूर आहे. साक्षात्कारी पुरुष देहभाव विसरतो व देहाविषयीं उदासीन राहतो ही गोष्ट लक्षांत ठेवणें अवश्यक आहे. "आतां देह राहो अथवा जावो, मी केवळ आत्माच आहें; दोरीचा साप खोटा आहे, दोरीच खरी आहे; पाण्यावरील तरंग खोटे आहेत, पाणीच सत्य आहे; लहरींच्या रूपानें तें मुळीं जन्मासाहि आलें नाहीं व त्या रूपानें तें नाशहि पावणार नाहीं; त्याप्रमाणें आत्मज्ञास आत्मज्ञानाच्या बाबतींत शरीराचें आठवणहि शिल्लक राहत नाहीं व तें केव्हां पडेल याविषयीं तो उदासीन असतो; तेव्हां आतां त्यास कोणत्याहि मार्गाचा शोध करण्याची काय जरूर? तोच स्वतः मूर्तिमंत अवघा देश व काळ झाल्यावर त्यानें जावयाचें तरी कोठें व केव्हां? घट फुटला म्हणजे घटाकाश महदाकाशांत मिसळून जातें हें खरें; परंतु यावरून 'घट फुटण्यापूर्वी त्यांत मुळीं आकाशच नव्हतें' असें अनुमान निघतें काय? म्हणून अर्जुना, तूं योग-युक्त हो, म्हणजे तुला त्यामुळें साम्यता सर्वकाळ व सहज प्राप्त होईल—मग वाटेल त्या वेळीं देह जावो अथवा राहो! तुझें आत्म्याशीं असलेलें ऐक्य कधींच बिघडणार नाहीं. (ज्ञा., ८, २४८-५७.)

## अनुभूतीचे मनावर परिणाम

शरीराविषयीं अशा प्रकारचें औदासीन्य दीर्घ अभ्यासानेंच योग्यास प्राप्त होतें सद्गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें परमेश्वराचें एकाग्र चित्तानें ध्यान करण्याचा अभ्यास दीर्घकाल केल्यानेंच शारीरिक सुखाविषयीं अशा प्रकारचें वैराग्य लाभतें. "भक्तियुक्त अंतःकरणानें परमेश्वराचें स्मरण केल्यामुळें तो सात्त्विक गुणांनीं अंतर्बाह्य भरून जातो. त्याच्या अहंकाराचा कठिणपणा विरून जातो व त्यास इंद्रिय–विषयांचा विसर पडतो. इंद्रियांची कसमस मोडते व मनाची घडी हृदयामध्यें पडते. ही ऐक्यभावना कायम राहील तोंपर्यंत साधकानें आपल्या आसनावरच बसून राहावें. आतां शरीर शरीरास ( व पवन पवनास ) संभाळतें, आत्मानंदाचा उत्कर्ष होऊं लागतो व बसतां क्षणींच ध्यानाचें इष्ट फल मिळतें." ( ज्ञा., ६, १८६–९१.) शरीर ताब्यांत येतांच मन व इंद्रियें सहजच ताब्यांत येतात. "अर्जुना, हीं इंद्रियें फार घातक आहेत. कडू असल्यामुळें जीवित वाढविणारें व मृत्यूसहि मागें सारणारें औषध वैरी आहे असें जीभ म्हणत नाहीं काय? जें खरोखर हितकर असतें तें दुःखकारक आहे असें हीं इंद्रियें नेहमींच भासवितात! जो योगाभ्यास मीं सांगितला त्याचा अभ्यास आसन दृढ ठेवून केला तर कदाचित् या इंद्रियांचा निरोध होऊन तीं तुझ्या कह्यांत येतील. त्यांचा निग्रह करून तीं पूर्ण ताब्यांत आणलीं, तर मन आपल्यांतच लीन होतें व अंतर्मुख होऊन आपलें आत्म्याशीं असलेलें ऐक्य पाहतें. हा अनुभव प्राप्त झाला कीं, साधक तत्क्षणीं आत्मसुखाच्या साम्राज्यावर आरूढ होतो व आत्म्याशीं एकरूप होऊन त्यांत विरून जातो." ( ज्ञा., ६, २६१–६७.)

## अनुभूतीचे नैतिक परिणाम

आतां आत्मानुभवाच्या नैतिक परिणामांचा विचार करूं : "तो अंतरीं परमात्मरूपांत दृढपणें स्थिर झाला असला तरी बाह्यतः सामान्य मनुष्याप्रमाणेंच वागतो. तो इंद्रियांना आज्ञा करीत नाहीं किंवा विषयांचें भय धरीत नाहीं. जें जें उचित कर्म करावयाचें, तें तें तो योग्य वेळीं व यथाविधि करतो.

कर्में करीत असतां कर्मेंद्रियांचा संयम करण्याची अवश्यकता त्यास वाटत नाहीं व तो त्यांच्या आहारींहि जात नाहीं. तो मोहमलानें लिंपत नाहीं. पाण्यानें धुतलेल्या कमळाप्रमाणें तो स्वच्छ असतो. संसारांत राहून तो सामान्य मनुष्या-सारखाच दिसतो खरा; परंतु तो पाण्यांत प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या बिंबा-प्रमाणें संसारापासून अलिप्त असतो. सामान्यतः पाहिल्यास तो साधारण मनुष्यासारखाच दिसतो; परंतु त्याच्या खऱ्या स्वरूपाचा निर्धार करणें अशक्य आहे. जो आशापाशरहित व संसारपाशापासून मुक्त झाला आहे, त्यास या चिन्हांनीं ओळखावें. (ज्ञा., ३, ६८–७४.) सहाव्या अध्यायांत पुनः साक्षात्कारी पुरुषाचीं लक्षणें ज्ञानेश्वरांनीं दिलीं आहेत. ते म्हणतात, "अशा साधुपुरुषानें शरीर धारण केलें असलें तरी तो वस्तुतः ब्रह्माच्या बरोबरीनें तोलतो. कारण, त्यानें आपलीं सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवलेलीं असतात. मेरुयेवढा प्रचंड सोन्याचा पर्वत व यःकश्चित् मातीचें ढेंकूळ दोन्ही तो सारखींच मानतो. पृथ्वीच्या मोलानेंहि विकत घेतां येणार नाहीं असें अमूल्य रत्न देखील तो दगडाप्रमाणें लेखतो. आतां त्यानें कोणास बंधु मानावें व कोणांस वैरी मानावें ? मीच विश्व आहें असें ज्ञान त्यास झाल्यामुळें तो सर्वांची सारखीच काळजी वाहतो. तो स्वतः तीर्थांचा राजा बनतो, त्याचें दर्शन पुण्यप्रद होतें व त्याच्या संगतींत भ्रांतालाहि ईश्वराचं ज्ञान होतें. त्याच्या शब्दांनीं धर्म जिवंत राहतो. त्याच्या दृष्टीनेंहि महासिद्धि प्राप्त होते. स्वर्गादि सुखें म्हणजे त्याचा नुसता खेळ ! सहज चुकून त्याची आठवण करणाऱ्यासहि तो आपली योग्यता देतो." (ज्ञा., ६, ९२–१०४.) ज्ञानेश्वर पुनः एका परिच्छेदांत सांगतात कीं, "आदर्श संत सदा पूर्ण चंद्रासारखा असतो व अधमास आणि उत्तमास सारखाच प्रकाश देतो. त्याची समता अखंड असते. त्याची सर्वभूतमात्रावरील दया अनुपमेय असते. त्याचं मन कधींच बदलत नाहीं. एकादी प्रिय गोष्ट घडली म्हणून तो आनंदानें बेहोष होत नाहीं वा अप्रिय गोष्ट घडली तरी विषाद मानीत नाहीं. म्हणून आदर्श संत हर्ष–शोक–रहित, आत्मबोधानें भरलेला व स्थितप्रज्ञ असतो." (ज्ञा., २, २९७–३००.)

## आत्मज्ञाचें रूपकात्मक वर्णन

ज्ञानेश्वरीच्या पंधराव्या अध्यायांत ईश्वरी साक्षात्कार झालेल्या साधूचें रूपकात्मक वर्णन दिलें आहे : " पावसाळ्याच्या शेवटीं मेघ ज्याप्रमाणें आकाशास सोडून जातात, त्याप्रमाणें मोह व मान त्यास सोडून जातात. केळीं झाडावर पक्क झालीं म्हणजे तीं आपोआप गळून पडतात. झाडावर घरटीं बांधून राहत असलेलीं पांखरें त्या झाडास आग लागली असतां दाही दिशांस उडून जातात, त्याप्रमाणें सर्व विकल्प त्यास सोडून पळतात. लोखंडास परीस सांपडत नाहीं किंवा अंधारास प्रकाश सांपडत नाहीं, त्याप्रमाणें त्याच्या मनास द्वैतभाव माहीत नसतो. असा आत्मज्ञ म्हणजे राजहंसच होय. तो आत्म-क्षीर-सागरांतील अनात्म–पाणी काढून टाकतो व आत्मक्षीराचेंच सेवन करतो. आत्मज्ञानाच्या अभावीं चारहि दिशांस पसरलेली वस्तु ज्ञानदृष्टीनें तो एकत्र करतो. गंगेचा ओघ सागरांत बुडतो, त्याप्रमाणें त्याचा विवेक आत्मस्वरूपाचा निर्धार करण्यांत मग्न होतो. अग्नीच्या डोंगरावर पेरलेलें बी अंकुर धरत नाहीं, त्याप्रमाणें त्याच्या मनांत विकार उत्पन्न होत नाहींत. समुद्र–मंथनाच्या वेळीं रवीप्रमाणें उपयोगीं पडलेला मंदाद्रि एकदां क्षीर–सागरांतून बाहेर काढल्यावर स्तब्ध राहिला, त्याप्रमाणें त्याच्या अंतःकरणांत वासनांच्या लाटा उसळत नाहींत. पूर्ण चंद्रमा जसा सर्व बाजूंनीं पूर्ण असतो, त्याप्रमाणें त्याच्यांत कोणत्याहि प्रकारें अपेक्षेचें न्यून दिसत नाहीं. " (ज्ञा., १५, २८४-३०४.)

## ज्ञान्यांचा मुकुटमणि

पुनः ज्ञानेश्वरीच्या चौदाव्या अध्यायांत ईश्वराशीं एकरूप झालेल्या आत्मज्ञांचीं आणखी कांहीं लक्षणें दिलीं आहेत : " आदर्श संत सकाळ, दुपार व संध्याकाळ, या तिन्ही काळांची गणना न करणाऱ्या सूर्यासारखा असतो, युद्धभूमीप्रमाणें तो जेता किंवा जितहि नसतो. घरीं जेवावयास बोलावलेल्या पाहुण्याप्रमाणें किंवा चौरस्त्यावरील मार्गदर्शक खांबाप्रमाणें तो उदास असतो. परंतु सूर्याच्या अस्तित्वामुळें जगांतील सर्व व्यवहार घडतात, त्याप्रमाणें त्याच्या

सत्तेमुळें हें जग चालतें. समुद्राला भरती येते, चंद्रकांत मणि द्रवतो, कमळ विकसतें, तरीहि चंद्र मात्र स्तब्ध राहतो, त्याप्रमाणें गुणांच्या गजबजण्यानें तो चळत नाहीं. (ज्ञा., १४, ३२०–४८.) शरीरभावरूपी पाण्यांतील मासोळी बनल्याशिवाय मनुष्यास सुखदुःखांचा त्रास होत नाहीं. मनुष्य आपल्या स्वरूपांत स्थिर झाला म्हणजे त्याला सुख व दुःख समान होतात. घरांतील खांबास रात्र व दिवस सारखींच असतात त्याप्रमाणें आत्माराम ज्याच्या देहीं ओतप्रोत भरला त्यास सर्व द्वंद्वें सारखींच वाटतात. निद्रिताच्या अंगास साप व उर्वशी समान वाटतात, त्याप्रमाणें स्वरूपीं राहणाऱ्या संतास परस्परविरोधी गुण समान होतात. काळोख व प्रकाश सर्यास सारखेच, त्याप्रमाणें स्वरूपीं राहणाऱ्या संतास निंदा व स्तुति सारख्यःच वाटतात. सर्व ऋतूंमध्यें आकाश अलिप्त राहतें, त्याप्रमाणें वैषम्य त्याच्या मनास शिवत नाहीं. तो मूर्तिमंत अग्नि असल्यामुळें त्याच्या कर्मांचीं फळें जळून जातात." (ज्ञा., १४, ३५०–६६.) तो एकाग्र चित्तानें माझी भक्ति करतो; म्हणून तो जरी गुणांचें सेवन करीत राहिला तरी तो त्यांना आपल्या स्वाधीन ठेवूं शकतो. आतां एकाग्र अथवा अव्यभिचारी भक्ति म्हणजे काय हें पाहूं या. रत्नाचें तेज म्हणजेच रत्न, द्रवपणा म्हणजेच पाणी, अवकाश म्हणजेच आकाश, गोडी तेचि साखर, गोठलेलें एकत्रित बर्फ म्हणजेच हिमालय, मुरलेलें दूध म्हणजेच दहीं, त्याप्रमाणें हें सर्व विश्व म्हणजेच मी. मला शोधण्यासाठीं विश्वाचें अस्तित्व नाकारण्याचें कारण नाहीं. सर्व विश्व माझ्यांत समाविष्ट झालें आहे. याप्रमाणें माझ्या स्वरूपाचा अनुभव घेणें म्हणजेच अव्यभिचारी भक्ति होय." (ज्ञा., १४, ३७२–८२.) "सोन्याचा कण सोन्यांत मिळून जातो, प्रकाशाचे किरण प्रकाशांत मिसळतात, हिमाच्या परमाणूंनीं हिमालय बनतो, त्याप्रमाणें व्यक्तिगत जीवात्म्यांचा परमात्मा होतो. तरंग लहान असले तरी ते समुद्राशीं एकरूप होत, हा अनुभव म्हणजेच खरी भक्ति होय." (ज्ञा., १४, ३८३–८८.) "हें साऱ्या ज्ञानाचें शिखर आहे; हें सर्व योगांचें सर्वस्व आहे. सागर व जलधर यांच्यामध्यें अखंड धारा लागावी व दोनहि एक व्हाव अथवा प्रकाशाच्या स्पर्शानें बिंब व प्रतिबिंब एक व्हावीं त्याप्रमाणें आत्मा परमपुरुषांत एकवटून जातो. सरपण जाळल्यावर अग्नि विझतो,

त्याप्रमाणें भेदाचा नाश करून ज्ञान आपणहि नाहींसें होतें. मी एलतीरावर आहें व माझा भक्त पैलतीरावर राहतो अशी वस्तुस्थिति नाहीं. आम्हां दोघांचें अनादि ऐक्य आहे, हें जो जाणतो तोच खरोखर ज्ञान्यांचा मुकुटमणि होय." (ज्ञा., १४, ३८९-४००.)

### अष्ट सात्त्विक भाव

परमेश्वर–दर्शनानें शारीरिक व मानसिक परिणाम काय होतात याचें रहस्य ज्ञानेश्वरांनीं अकराव्या अध्यायांतील एका परिच्छेदांत सांगितलें आहे. हें वर्णन भारतीय अनुभूति–शास्त्रांत 'अष्ट सात्त्विक भाव' या नांवानें सुप्रसिद्ध आहे. "विश्व एक व आपण एक असें जें थोडेंसें दुजेपण होतें, तेंहि आटून गेलें व अंतःकरण एकदम शांत झालें. आंतून आनंदाचा झरा वाहूं लागला, बाहेरून इंद्रियें पांगुळलीं. वर्षाकालाच्या आरंभीं पर्वतावरील सर्व प्रदेश कोंवळ्या गवतानें आच्छादून जातो त्याप्रमाणें नखशिखांत शरीर रोमांचांनीं पुलकित झालें! चंद्रकांत मण्यावर चंद्राचे किरण पडले म्हणजे त्यावर थंड पाण्याचे थेंब सांचतात, त्याप्रमाणें त्याच्या शरीरावर स्वेद–कणिका दाटली. कमलकलिकेंत भुंगा सांपडला असतां, ती जशी जलपृष्ठावर डोलूं लागते, त्याप्रमाणें अंतःकरण सुखाच्या ऊर्मींनीं भरून गेल्यामुळें साधकाचें शरीर बाहेरून कांपूं लागतें. कापूर-केळींतील गाभ्याचे आंतील पडदे उकलले असतां आंत कापूर खचून भरलेला असल्यामुळें त्यांतून कापुराचे कण गळतात, त्याप्रमाणें त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागतात. चंद्राचा उदय झाला म्हणजे भरलेल्या समुद्रासहि भरती यते, त्याप्रमाणें अंतःकरणांत वरचेवर आनंदाच्या लहरी येत असल्यामुळें त्याचें हृदय वारंवार उचंबळून येऊं लागतें. याप्रमाणें आठहि सात्त्विक भावांत जणूं स्पर्धा सुरू होते व जीवास ब्रह्मानंदाचें साम्राज्य प्राप्त होतें." (ज्ञा., ११, २४५–५२.)

### भय व आनंद यांची स्पर्धा

परमार्थांत साधकाची प्रगति होऊं लागली म्हणजे त्याच्या अंतःकरणांत भय व आनंद या दोन भावांमध्यें स्पर्धा कशी सुरू होते हें अर्जुनाच्या बाबतींत

विशेष स्पष्टपणें दिसून येतें, ही गोष्ट येथें नमूद करणें जरूर आहे. श्रीकृष्णानें अर्जुनास आपलें विश्वरूप दाखविलें, तेव्हां तो भयभीत झाला व श्रीकृष्णास म्हणाला, " देवा, हा मातीचा देह जावो अथवा राहो, याची फिकीर मला नाहीं; परंतु हें तुझें भव्य विश्वरूप पाहून माझें चैतन्य राहील किंवा नाहीं याचीच मला भीति वाटूं लागली आहे ! माझ्या बुद्धीचा मीपणा या भयानें नष्ट होऊं पाहत आहे आणि निश्चल व आनंदमय अशा माझ्या अंतरात्म्यासहि कंप सुटला आहे. देवा, या साक्षात्काराचें केवढें हें सामर्थ्य ! माझा बोध देशोधडीस गेला व आपला गुरु–शिष्य–संबंधहि क्षणांत नाहींसा होईल ! " ( ज्ञा., ११, ३६६–७०. ) या भयाच्या विरुद्ध अद्वैत–स्वरूपानंदाचें वर्णन आहे ! अनुभूतीच्या भयानकतेमुळें भीति वाटते, तर तिच्या नावीन्यामुळें व अनन्यसाधारणतेमुळें आनंद वाटतो. ऐक्यभावांत सर्व द्वैताचा लोप होतो व यांतंच अनंत आनंदाचा झरा आहे. " पक्षी फळ चाखतो त्या वेळीं त्यास फळ आपल्याहून भिन्न आहे असें वाटतें. परंतु आत्मस्वरूपाचा अनुभव आला, तर त्या आनंदमय स्थितींत एक अशी ऊर्मी उठते कीं जिच्यामुळें सर्व अहंकाराचा नाश होतो व सुखाची मिठी बृढावते. या आलिंगनसमयीं ऐक्यभावाचा आपोआप उगम होतो व पाणी पाण्यांत मिसळून एक व्हावें तशी अवस्था होते आणि आकाशांत वायु विरला कीं वायु व आकाश ही द्वैताची भाषा नष्ट होते, त्याप्रमाणें त्या स्वरूपालिंगनांत केवळ आनंदभावच बाकी राहतो. द्वैताचा तर नाश होतोच, परंतु या स्थितीस ऐक्यस्थितीहि म्हणतां येत नाहीं; कारण, ही स्थिति अनुभवण्यास एकहि साक्षी राहत नाहीं. " ( ज्ञा., ५, १३१–३५. )

## शेवट गांठणारा विरळा

ही स्थिति फारच थोड्या लोकांना व क्वचितच अनुभवतां येते परमार्थ-मार्गावरील प्रत्येक साधकाच्या नशिबीं हें असतें असें म्हणतां येणार नाहीं, ही गोष्ट ज्ञानेश्वरांनीं मुद्दाम नमूद केली आहे. शेवट गांठणारा साधक विरळा असें सातव्या अध्यायांत त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें आहे. हजारों लोकांपैकीं एकाद्यालाच परमार्थ–मार्गास लागण्याचें धैर्य होतें व अशा धैर्यवानांपैकीं ज्यास

खरें ज्ञान प्राप्त होतें असा साधक विरळाच निघतो. असंख्य लोकांमधून एकाददुसऱ्याची सैन्यांत सैनिक म्हणून निवड होते व प्रत्यक्ष रणांगणावर लढूं लागल्यावर शस्त्रास्त्रांचा खणखणाट सुरू होऊन तीं एकमेकांच्या अंगांत घुसूं लागलीं म्हणजे अशा लक्षावधि सैनिकांपैकीं एकाद्याच्याच गळ्यांत विजयश्री माळ घालते, त्याप्रमाणें भक्तीच्या व आस्थेच्या महापुरांत कोट्यवधि जिज्ञासू उडी टाकतात; परंतु परमेश्वर–प्राप्तीच्या पैलतिरीं पोंचणारा एकादाच निघतो ! ( ज्ञा., ७, १०–१३. )

## क्रम–मुक्ति

परमार्थांत पूर्णता क्रमशः प्राप्त होते असें ज्ञानेश्वरांनीं अगदीं स्पष्टपणें सांगितलें आहे. परमार्थ–मार्गावर पाऊल ठेवतांच अंतिम ध्येय गांठण्याचा उतावळेपणा कोणीं करूं नये, " आत्मसाक्षात्काराची बौद्धिक तयारी पूर्णपणें केली असली व सुदैवानें सद्गुरु भेटून त्यांनीं त्यास खऱ्या मार्गाचा उपदेश केला, तरी औषध घेतल्याबरोबर गुण येऊन रोगी तत्काळ बरा होईल काय ? सूर्य उगवल्याबरोबर मध्याह्न होईल काय ? जमीन चांगली नांगरली, पाण्यानें भिजविली व नंतर तिच्यांत उत्तम बीं पेरलें, तरी अलोट पीक येण्यास वेळ लागणारच ! त्याप्रमाणें वैराग्य लाभलें, सद्गुरु भेटले व अंतःकरणांत विवेकाचा अंकुर फुटला, तरी जग मिथ्या असून एक परमेश्वरच सत्य आहे हें सानुभव ज्ञान प्राप्त होण्यास वेळ लागणारच ! ब्रह्मांत एकत्वानें ब्रह्म होऊन राहणें हें क्रमानेंच साधेल. भुकेलेल्याच्या पुढें पंचपक्वानांचें ताट वाढलें, तरी त्यास तृप्ति ग्रासोग्रासांनींच प्राप्त होणार ! त्याप्रमाणें वैराग्याच्या तेलानें विवेकाचा दिवा पेटविला म्हणजे त्या दिव्याच्या प्रकाशानें आत्मठेवा शोधून काढतां येईल. ( ज्ञा., १८, ९९६–१००८. )

## क्रम–मुक्तीचा खरा अर्थ

ज्ञानेश्वरींतील शेवटचा अध्याय म्हणजे ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची परिणतीच होय. या अध्यायांत त्यांनीं परमेश्वर–प्राप्ति क्रमानेंच होते असें प्रति-

पादिलें आहे. बीजगणितांत **पॅराबोला** या आकृतीचीं दोन्ही टोकें मूळ रेषांच्या अधिकाधिक जवळ जवळ जातात, परंतु त्यांना प्रत्यक्ष कधींच भिडत नाहींत, त्याप्रमाणें जीव परमात्म्याच्या अगदीं जवळ जवळ जातो, परंतु त्याशीं एकरूप कधींच होत नाहीं, असा या क्रम-मुक्तीचा भावार्थ आहे. परमार्थांत जीव क्रमानेंच ईश्वर-स्वरूपांत समरस होत जातो व या ऐक्य-भावांतहि तो ईश्वरापेक्षां सदैव किंचित् कमीच कसा राहतो हें सर्व ज्ञानेश्वरांनीं या अठराव्या अध्यायांत अनेक अलंकारांच्या साहाय्यानें मोठ्या बहारीनें वर्णिलें आहे : "वैराग्याचें चिलखत अंगावर चढवून असा संत 'राजयोग'-रूपी घोड्यावर स्वार होतो व विवेकाच्या मुठींत ध्यानाची तलवार दृढ धरून आपल्यासमोर आलेल्या लहानमोठ्या संकटांचें निवारण करतो. सूर्य जसा अंधारांत निःशंक पणें शिरतो, त्याप्रमाणें तो (संत) संसार-रणांत मुक्तिकांता वरण्यासाठीं बेधडक शिरतो. अहंकार, दर्प, काम, क्रोध इत्यादि त्याच्या मार्गांत आडव्या येणाऱ्या शत्रूंचे तो तुकडेतुकडे करतो. मग मांडलिक राजे सम्राटास सामोरे जातात त्याप्रमाणें सर्व सद्गुण त्याच्या स्वागतार्थ सामोरे येतात. परमार्थाच्या राज-मार्गावर तो चालला असतां, पावलोपावलीं अवस्थारूपी अप्सरा त्याचें स्वागत करतात व त्याची पूजा करतात. ऋद्धि-सिद्धि-रूपी कुमारिका सामोऱ्या येऊन त्यास आरती ओंवाळतात. हा अपूर्व देखावा पाहण्यासाठीं हजारों शक्तिदेवता त्याच्याभोंवतीं जमतात व त्याजवर पुष्पवृष्टि करतात. याप्रमाणें तो खऱ्या स्वराज्याच्या प्राप्तीच्या जवळ जवळ येऊं लागतो तेव्हां त्यास हें सर्व त्रैलोक्य आनंदानें भरलेलें दिसतें. मग त्यास शत्रु, मित्र कोणीहि उरत नाहीं. सर्वत्र समता नांदूं लागते व 'मी'-'तूं'-पणाचा नाश होतो. याप्रमाणें सर्व शत्रुवर्ग जिंकल्यावर व जगास तुच्छ मानल्यावर त्याचा योगतुरंग थोडी विश्रांति घेतो. वैराग्याचें चिलखत या वेळेपर्यंत त्याच्या शरीरास जें चिकटून होतें तें तो थोडें ढिलें करतो व समोर कोणीहि शत्रु शिल्लक न राहिल्यामुळें तो ध्यानाची तलवार मागें घेतो आणि ज्या गांवास जावयाचें तें गांव दिसूं लागलें म्हणजे जसा मनुष्य सावकाश चालूं लागतो, त्याप्रमाणें आत्मसाक्षात्काराचें ध्येय त्याला दृग्गोचर होऊं लागल्यावर तो आपलें साधन कमी करतो. सागराच्या जवळ

आल्यावर गंगेचा खळखळाट बंद होतो, पतीजवळ येतांच पत्नीचा कंप नाहींसा होतो, केळीं पक्क झाल्यावर केळीच्या झाडाची वाढ खुंटते किंवा गांवाकडे वळणारा मार्ग गांव लागतांच गांवांत लुप्त होतो, त्याप्रमाणें आत्म-साक्षात्कार होऊं लागला हें त्यास कळतांच तो आपलें साधन-हत्यार हळूच खालीं ठेवतो व ज्याप्रमाणें चतुर्दशीचा चंद्र पौर्णिमेच्या पूर्ण चंद्रापेक्षां किंचित् कमी असतो, पंधरा कसाचें सोनें सोळा कसाच्या उत्तम सोन्यापेक्षां किंचित् न्यून ठरतें किंवा समुद्र व नदी यांतील फरक स्थिरता व खळखळ यांवरून दिसतो, त्याप्रमाणें ईश्वर व ईश्वरी साक्षात्कार झालेला भक्त यांमध्यें येवढाच सूक्ष्म भेद राहतो. तो ईश्वरांत मिळून जातो; परंतु ईश्वराच्या पूर्णतेच्या मानानें त्याच्यांत किंचित् न्यून राहतें." (ज्ञा., १८, १०४७-९०.)

## ईश्वर संतांचा एकमेव विषय होय

आतां ज्ञानेश्वरांनीं जीव व ईश्वर यांच्या ऐक्याविषयीं काय प्रतिपादिलें आहे तें पाहूं. संतांना ईश्वर हा एकच सर्वंकष विषय असतो असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे : "या शरीर-संयोगाच्या रात्रीं तो एकटाच फिरत असतांना कर्मक्षयाची पहांट आपोआप व एकदम झाली, गुरुकृपेच्या उषःकालानतर आत्मानुभवाचें प्रातःकालचें कोंवळें ऊन्ह पडलें व त्याच्या दृष्टी-पुढें साम्याचा विस्तीर्ण प्रदेश पसरलेला दिसला. त्या वेळीं तो पाही त्या ठिकाणीं त्यास माझें स्वरूप दिसूं लागलें. तो निवांत राहिला तरी मीच त्याच्या-पुढें राहिलों ! त्याला सर्वत्र माझ्याशिवाय कांहींच राहिलें नाहीं. घट पाण्यांत बुडविला तर त्याच्या आंत-बाहेर पाणीच भरून राहतें, त्याप्रमाणें तो माझ्यांत व मी त्याच्या आंत-बाहेर भरून राहिलों आहें. अर्जुना, हा नुसता बोलावयाचा व अर्थहीन शब्दांचा विषय नव्हे, तर हा प्रत्यक्ष अनुभव आहे !" (ज्ञा. ७, १३०-३४.)

## भक्तांचा सुख-संवाद

भक्तांचें परमेश्वरावर अव्यभिचारी प्रेम असल्यामुळें, त्यांच्याबद्दल तसेंच प्रेम करणाऱ्या संतांविषयींहि त्याला तितकेंच उत्कट प्रेम वाटूं लागतें. अशा

भक्तांच्या आपापसांतील सुख-संवादाचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं फार उत्तम प्रकारें दहाव्या अध्यायांतील एका परिच्छेदांत केलें आहे : “ते अंतःकरणानें माझ्याशीं एकरूप झालेले असतात व मी त्यांचा प्राण बनतों, आत्मानुभवाच्या धुंदीनें त्यांना जीवन–मरणांचा विसर पडतो. या आत्मज्ञानाच्या मदानें व सुख–संवादाच्या संतोषानें ते नाचूं लागतात व एकमेकांना ते आतां बोधच देतात व घेतात. एकमेकांशेजारीं असलेलीं दोन सरोवरें पाण्यानें उचंबळलीं तर एकमेकांतील तरंग एकमेकांत मिसळतात व अशा संमिश्र तरंगांपासून जणूं तरंगांचींच धवलागारें ( सफेत मंदिरें ) निर्माण होतात, त्याप्रमाणें या एकांतिक भक्तांचे आनंद–कल्लोळ एकमेकांत मिसळून त्यांची जणूं वेणी बनते व हे एकमेकांस बोधाच्या अलंकाराप्रमाणें शोभून या बोधानेंच मिरवतात. सूर्यानें सूर्यास ओंवाळावें, चंद्रानें चंद्रास अलिंगन द्यावें किंवा दोन समान प्रवाह एकमेकांत मिसळावे, त्याप्रमाणें या संतांचें परस्परांवरील सारखें उत्कट प्रेम एकत्र मिसळून त्यांचें सामरस्याचें प्रयाग बनतें व त्यावर अष्ट सात्त्विक भाव तरंगत राहतात. या आनंदभरांत ते आपल्यास विसरतात व मी त्यांच्या अंतःकरणांत भरून राहिल्यामुळें ते सर्व जगास माझा महिमा वर्णन करून सांगतात. गुरुशिष्यांच्या एकांतीं ज्या अक्षराचा उच्चार झाला होता, ते हे संतश्रेष्ठ मेघाप्रमाणें गर्जना करून सर्व विश्वाला सांगतात. कमलाची कळी उमलूं लागली म्हणजे तिच्यांत सांठविलेला सुगंध मावेनासा होऊन ती रावारंकांमध्यें तो सुवास पसरविते, त्याप्रमाणें ते सर्व जगांत माझी कीर्ति पसरवितात, या गुणानुवादाच्या आनंदांत आपणां स्वतःसहि विसरतात व या विसरण्यांत त्यांचें शरीर व त्यांचा प्राण विरून जातात.” ( ज्ञा, १०, ११९–२८.)

**देव, कान्त व भक्त, वल्लभा**

ईश्वरास भक्तांहून प्रिय या जगांत दुसरें कोणीच व कांहींच नाहीं, हें ज्ञानेश्वरांनीं अनेक वेळां सांगितलें आहे : “जें गूढ रहस्य श्रीकृष्णांनीं आपला पिता वसुदेव यास किंवा माता देवकी हीस किंवा प्रत्यक्ष सख्खा भाऊ बलिभद्र यास सांगितलें नाहीं, तें त्यानें भक्तश्रेष्ठ अर्जुनास सांगितलें ! श्रीकृष्णाची

पत्नी लक्ष्मी इतकी त्याच्याजवळ असूनहि तिला हें प्रेमसुख अनुभवावयास मिळालें नाहीं ! आज श्रीकृष्ण–प्रेमाचें सर्व सामर्थ्य अर्जुनास मिळालें ! सनकादिकांच्या महत्त्वाकांक्षा अमर्याद वाढल्या, परंतु त्यांनाहि इतक्या पूर्णत्वानें श्रीकृष्णप्रेम अनुभवतां आलें नाहीं. श्रीकृष्णाचें अर्जुनावरील प्रेम खरोखरच निरुपम आहे. तें मिळविण्यासाठीं त्यानें किती अत्त्युत्तम पुण्य केलें असेल ! " ( ज्ञा., ४, ८–११. ) येथें देवास भक्तांपेक्षां कांहींच जास्त प्रिय नाहीं हें आपण पाहिलें. बाराव्या अध्यायांत एके ठिकाणीं ' देव, पति व भक्त, त्याची पत्नी ' असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे. देव–भक्तांचें नातें स्पष्ट करून सांगावयाचें झाल्यास तत्सदृश व त्याच्या अगदीं जवळचें नातें म्हणजे पतिपत्नींचें होय, असें प्रेम–दर्शन–कारांचें मत आहे व या मताचा ज्ञानेश्वरांच्या मनावर थोडा परिणाम झाल्यामुळें त्यांनीं असें विधान केलें असावें असें आम्हांस वाटतें. उत्तमास आधार द्यावा पण अधमास मात्र घालवून द्यावें हें जसें पृथ्वी जाणत नाहीं, गाईची तहान भागवावी पण वाघास मात्र विष होऊन मारावें हें जसें पाण्यास शक्य होत नाहीं, त्याप्रमाणें कोणाहि भूतमात्रांविषयीं द्वेष त्यास माहीत नसतो. सर्व भूतमात्रांशीं त्याची मैत्री एकसारखी असून, तो कृपेचा जणूं मूर्तिमंत जिवंत झराच असतो ! त्यास ' मी ' ही भाषाच माहीत नसते, तो कांहींच ' माझें ' म्हणत नाहीं व सुखदुःख सारखें मानतो. क्षमेच्या बाबतींत तो पृथ्वीशीं बरोबरी करतो व त्यानें संतोषास जणूं आपल्या अंतःकरणांतच कायमचें घर करूं दिलें आहे ! जीव व परमात्मा एकाच आसनावर बसून त्याच्या हृदय–साम्राज्यांत नांदतात. " योगामध्यें पूर्णता मिळवूनहि जो आपलें मन व बुद्धि मला सर्वस्वीं अर्पण करतो, तोच हे अर्जुना ! माझा खरा भक्त, तोच खरा योगी व तोच खरा मुक्त होय. 'तो वल्लभा व मी त्याचा कांत', असें आमचें नातें जडतें. याविषयीं बोलणें म्हणजे देखील एक प्रकारची भुरळ किंवा उन्माद आहे. माझ्या प्रेमानें हे शब्द माझ्या तोंडून वदविले नसते, तर मी याविषयीं कांहींच बोललों नसतों ! हें सुख मला मिळालें याबद्दल मला अत्यंत आनंद वाटतो. असें म्हणून आनंदभरांत श्रीकृष्ण डोलूं लागले ! " (ज्ञा., १२, १४४–६२.)

**भक्तांच्या योगक्षेमाची काळजी देवास**

संतांचा योगक्षेम वाहणें हें देव आपलें कर्तव्य मानतो असें ज्ञानेश्वर सांगतात : "पोटांतील गर्भ–गोळ्यास दुसरा कोणताहि उद्योग माहीत नसतो, त्याप्रमाणें ज्यांनीं आपल्या सर्व प्रकारच्या वृत्तींसह आपलें सर्वस्व मला उक्तें विकलें, ज्यांना माझ्याशिवाय दुसरें श्रेष्ठ वा प्रिय-तर कांहींच उरलेलें नसतें, जे मला आपलें जीवन–सर्वस्व मानतात, जे माझें एकाग्र चित्तानें सतत ध्यान करतात, त्यांची मी स्वतः सेवा करतों. ज्या क्षणीं ते सर्वांतःकरणानें माझ्या मार्गास लागतात, त्या क्षणापासून त्यांची चिंता मी वाहूं लागतों. पंख न फुटलेल्या पिलांची सर्व काळजी पक्षीण वाहते, त्याप्रमाणें त्यांच्या मनांत जें जे करावें असें येतें तें तें सर्व मला त्यांच्यासाठीं करावें लागतें. आपली तहानभूक विसरून आई ज्याप्रमाणें आपल्या मुलाचें सर्व आपण होऊन करते, त्याप्रमाणें जे मला अनुसरतात, त्यांचें सर्व कोड मी पुरवितों. त्यांना सायुज्य मुक्तीची इच्छा असली तर तीहि मी त्यांना देतों. माझी सेवा करण्याचें त्यांच्या मनांत आलें तर त्यांना माझी त्याप्रमाणें सेवा करतां यावी म्हणून मी त्यांच्या अंतःकरणांत माझ्याविषयीं प्रेम उत्पन्न करतों. याप्रमाणें ते मनांत जो जो भाव धारण करतात, तो तो हळूहळू त्यांना देऊन त्यांची योग्य वेळीं पूर्तता पण मीच करतों." ( ज्ञा., ९, ३३५–४२. ) भक्तांनीं आपल्या ऐहिक व पारमार्थिक कल्याणाची चिंता बाळगण्याचें कांहींच कारण नाहीं असें पुनः दुसऱ्या एका परिच्छेदांत ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे : "वर्णाश्रमानुसार आपल्या वांट्यास आलेलीं सर्व कर्में त्यांचीं कर्मेंद्रियें सुखानें करतात. नीतीनें व धर्मानें सांगितलेल्या सर्व विहित आज्ञा ते पाळतात व निषिद्ध कर्में टाकतात. सर्व कर्में मला अर्पण करून ते कर्म-फळें जाळतात. त्यांच्या कायिक, वाचिक व मानासिक भावांची धांव माझ्यावांचून दुसऱ्या कोणत्याच वस्तूकडे नसते. याप्रमाणें तत्पर होऊन ते माझी उपासना करतात. अनन्यभावानें ज्यांनीं मला आपला जीव तसेंच आपलें मन विकलें, त्यांच्यासाठीं हे अर्जुना! मी काय करणार नाहीं? या ऐहिक जीवनांत माझ्या भक्तास कसल्या तरी संकटापासून त्रास होईल काय? समर्थांची कांता कधीं भीक मागेल काय?" ( ज्ञा., १२,

७६–८५.) भक्तांच्या सर्व वासना देव पूर्ण करतो हाच विचार पुनः दहाव्या अध्यायांत सांगितला आहे : "माझ्यावरील त्यांच्या प्रेमातिशयानें ते दिवस व रात्र यांतील भेद आपलेपणानें नाहींसा करतात व माझें पूर्ण सुख अनुभवीत राहतात. त्यांचें सुख अधिकाधिक वाढवावयाचें व कोणत्याहि अपघातानें त्यांच्या आनंदांत व्यत्यय न येईल व त्यांच्यावर काळाची दृष्टि न पडेल असें करावयाचें, येवढेंच त्यांच्या बाबतींत माझें कर्तव्य ठरतें. आपला आवडता मुलगा खेळत असतां त्याजवर आपल्या दृष्टीचें पांघरूण घालून त्याची आई ज्याप्रमाणें तो मागेल तें खेळणें हातांत घेऊन त्याच्या मागेंपुढें धांवते व तो मागेल ते खेळ सोन्याचे करून देते, त्याप्रमाणें माझ्या भक्ताच्या सर्व पारमार्थिक महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्याचें काम मी पत्करतों. माझ्या भक्ताला माझी आवड असते व मला त्याच्या एकांतिक भक्तीचेंच अमोल महत्त्व वाटतें. देव–भक्तांमधील खरी भक्ति खरोखरच फार कठिण असते. मीं लक्ष्मीस माझें सर्वस्व दिलें आहे; परंतु आत्मज्ञान मात्र तिच्यापासून लपवून ठेवलें आहे व तें मी माझ्या भक्तांस देतों." ( ज्ञा., १०, १२९–३९. )

## भक्तानें दिलेल्या अत्यल्प गोष्टीचाहि देव स्वीकार करतो

भक्तानें दिलेल्या अगदीं क्षुल्लक गोष्टीचाहि देव कसा आनंदानें स्वीकार करतो हें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे : " अमर्याद प्रेमाच्या उल्हासानें मला अर्पण करण्यासाठीं माझा भक्त एकाद्या भलत्याच झाडाचें फळ आणतो, तेव्हां मी आपले दोनहि हात पुढें करून तें घेतों व देंठ न तोडतां तोंडांत टाकतों. भक्तानें प्रेमानें एकादें फूल मला दिलें, तर वास्तविकपणें मीं त्याचा वास घ्यावा; परंतु तें विसरून मीच तें खाऊं लागतों! फुलांची गोष्ट कशाला? एकादें हिरवें किंवा वाळलेलेंहि पान भक्तानें मला दिलें, तर तें सर्व प्रेमानें भरलेलें पाहून भुकेल्यानें अमृत चाखावें तितक्या गोडीनें मी तें खातों व मला तितकाच आनंद होतो. एकादे वेळीं पालाहि मिळेनासा होईल; परंतु पाणी मिळणें तर कठिण नाहीं ना? तें सर्वत्र व विनामूल्य मिळतें. परंतु तेंहि भक्तानें मला सर्वान्तः-करणानें दिलें, तर तेंच मला वैकुंठाहूनहि विशाल व कौस्तुभमण्याहूनहि मूल्य-

वान् वाटतें. सुदाम्याचें गांठोडें सोडून त्यांतील पोहे मीं खाल्ले, हें अर्जुना, तूं ह पाहिलेंच आहेस. मी फक्त एक भक्ति जाणतों. मला लहानमोठा हा भेद माहीत नाहीं. मी भक्तीचा पाहुणा व भावाचा भुकेला आहें. कोणत्या भावानें मला वस्तु अर्पण करण्यांत येते याचें मला विशेष महत्त्व वाटतें. पत्र, पुष्प व फल हीं मला पूजावयाचीं बाह्य साधनें आहेत. एकाग्र भक्ति हीच माझी खरी पूजा होय." (ज्ञा., ९, ३८२-९६.)

## भक्त देवाच्या माथींचा मुकुट होय.

भक्त देवावर नितान्त प्रेम करतो, म्हणून त्याच्या मोबदल्यांत देव त्यास आपल्या शिरावरील मुकुटमणीच मानतो. "तो मानवी जीवनांतील उच्चतम ध्येय हातीं घेऊन तें जगांतील सर्व लोकांमध्यें भक्तिरूपानें वांटत चालला आहे. त्याच्याबद्दल **मला** आदर वाटतो व **मी** त्यास आपलया माथ्यावरील मुकुट-मणि करतों. त्याच्या टांचेची लाथ **मीं** हृदयावर धारण केली आहे. त्याचे गुणानुवाद म्हणजे **माझ्या** वाणीचे अलंकार होत. त्याच्या कीर्तीनें **माझ** कान **मी** भरले आहेत. मी अचक्षु असूनहि त्याला पाहण्याच्या इच्छेनें मी डोळे धारण करतों व माझ्या हातांतील लीला-कमलानें मी त्याला पूजितों. त्यास आलिंगिण्यासाठीं मी दोन अन् दोन असे चार हात घेऊन आलों! मी त्याचें ध्यान करतों; तोच माझें खरें दैवत व मीच त्याची पूजा करतों. मला त्याचें व्यसन असून तोच माझें निधि-निधान आहे व त्याच्या संगतींतच मला समाधान मिळतें." (ज्ञा., १२, २१४-३७.)

## ईश्वरच भक्तास परमार्थ-मार्गावर पुढें नेतो

परमेश्वरच भक्तास मुक्ति म्हणजे परमार्थांतील अन्तिम सुख देतो: "माझा भक्त संसार-सागरांत भयभीत झाला आहे व जन्म-मृत्यूंच्या लाटांत सांपडून बुडून मरणार हें पाहून मी माझीं विविध रूपें एकत्र करून त्याच्या मदतीस धांवून जातों. मी त्यास या संसार-सागराच्या पैलतीरीं नेण्यासाठीं बोट बनून त्याच्या जवळ जातों व ईश्वराचीं अनंत नांवें म्हणजेच त्या बोटीस जोडलेल्या नावा होत. जे सडे दिसतात, त्यांना मी माझी कांस धरून येऊं

देतों; जे गृहस्थाश्रमी व कुटुंबी आहेत, त्यांना नावेंत बसवितों; बाकीच्यांच्या पोटास प्रेमाची पेटी बांधतों व सर्वांना सायुज्य-मुक्तीच्या पैलतीरीं सुखरूप आणतों. या भक्तीच्या नावेंत बसवून चतुष्पाद् प्राण्यांस देखील मीं वैकुंठास नेलें आहे. म्हणून, अर्जुना! माझ्या भक्तांस चिंता करण्याचें कांहींच कारण नाहीं. त्यांचा उद्धार करण्यास मी सदैव तयार असतों. त्यांनीं आपलें अंतःकरण मला अर्पण करतांक्षणीं त्यांचें संरक्षण करण्याची जबाबदारी मी आपल्यावर घेतों. म्हणून, हे भक्तराजा अर्जुना! या भक्तिमार्गानें जाणें येवढेंच तुझें कर्तव्य." (ज्ञा., १२, ८७-९६.)

## भक्ताच्या मृत्युसमयीं देवाची त्याच्यावर विशेष कृपा

मरण-समयीं देव आपल्या भक्तांवर विशेष कृपा करतो : "मरण-काळीं भक्ताकडून देवाचें स्मरण कसें होईल? कारण, त्या वेळीं इंद्रियें लुळीं पडतात, जीव दुःखसागरांत बुडतो व आंत-बाहेर मृत्यूचीं चिन्हें दिसूं लागतात. 'अशा वेळीं तो ध्यानास कसा बसेल, इंद्रियें स्वाधीन कशीं ठेवील व कोणत्या अंतःकरणानें प्रणवानें ईश्वर-स्मरण करील?' अशी हे अर्जुना! तुला शंका येईल, तर तूं लक्षांत ठेव कीं, माझ्या भक्तीनें माझी आजन्म सतत सेवा केली असेल तर त्याच्या मरणकाळीं मी त्याचा सेवक बनतों. माझ्यासाठीं त्यानें सर्व विषयांस व प्रवृत्तींस तिलांजलि दिली, मला आपल्या अंतःकरणांत कोंडून ठेवलें, माझ्या साक्षात्काराचा आनंद सदैव उपभोगिला व माझ्याशीं एकरूप होऊनहि माझी पूजा केली. अशा माझ्या भक्तास मरण येण्याच्या वेळीं माझें स्मरण झालें नाहीं व मी त्याच्या मदतीस धांवून गेलों नाहीं, तर त्यानें जन्मभर केलेल्या उपासनेची किंमत काय राहिली? एकाद्या दीन भक्तानें काकुळतीनें माझी करुणा भाकिली तर त्याचा उद्धार करण्यास मी धांवून जात नाहीं काय? माझ्या भक्तांचीहि दशा अशीच झाली, तर त्यानें जन्मभर भक्तीचा इतका सोस कां करावा? म्हणून अर्जुना, अशी शंका घेऊं नको. तो माझें स्मरण करतां क्षणीं मी त्याच्यापुढें उभा राहतों. त्याच्या भक्तीचें ओझें मला सहन करवत नाहीं! तो माझा सावकार व मी त्याचा ऋणको! हें ऋण फेडण्यासाठीं त्याच्या मरण-

समयीं मी त्याची चाकरी करतों. देह-दुःखानें त्याची स्मृति नाहींशीं होईल, म्हणून मी त्यास आत्मबोधाच्या पिंजऱ्यांत ठेवतों व त्याच्या भोंवतीं माझ्या स्मरणाची थंड व प्रशस्त सांवली पसरतों. मी माझ्या भक्तांना माझ्याकडे सुखानें घेऊन जातों.' (ज्ञा., ८, १२०-३३.)

## साधु देह कसा ठेवता ?

या प्रकारचें संरक्षण आपणास मिळतें याची खात्री बाळगून भक्तानें आपला जीव परमेश्वरांत मिसळून टाकावा व एकाग्र चित्तानें शुद्ध ब्रह्माचें ध्यान करावें : "भक्तानें उत्तरेकडे तोंड करून पद्मासनावर बसावें, अंतःकरण स्वरूप-प्राप्तीच्या प्रेमानें भरून टाकावें व परमेश्वराच्या रूपांत समरस होण्याचें एकच ध्येय दृष्टीपुढें ठेवावें. त्यानें आपल्या मनास अन्तर्धैर्याचा टेकू द्यावा, भक्तीच्या भावानें अंतःकरण भरावें व योगबलानें देह सोडण्याची तयारी करावी. घंटेचा नाद घंटेमध्यें लय पावतो, त्याप्रमाणें भक्तानें भ्रुकुटीमध्यें प्राणाचा लय करावा व घटानें झांकलेला दिवा केव्हां गेला हें समजत नाहीं, त्याप्रमाणें भक्तानें देह ठेवावा. असा पुरुष केवळ परब्रह्म व परमपुरुष असून, तो माझें माहेरघर होऊन राहतो." (ज्ञा., ८, ९१-९९.) "आणि दुधापासून घुस॰ळून काढलेलें लोणी निश्चयेंकरून पुनः दूध होत नाहीं, त्याप्रमाणें मला एकदां येऊन मिळणाऱ्यास पुनरावृत्ति नाहीं. अर्जुना, हें अंतरंगींचें वर्म मी तुला सांगत आहें." (ज्ञा., ८, २०२-२०३.)

## देव-भक्तांचा संयोग

परमार्थाचें अंतिम ध्येय म्हणजे देव-भक्तांचा संयोग होय असें ज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानेश्वरींत अनेकदां वर्णिलें आहे; कांहीं ठिकाणीं या दोहों-मध्यें थोडा भेद असल्याचें ते सांगतात, तर इतर कांहीं ठिकाणीं देव व भक्त एकरूप असल्याचें प्रतिपादितात. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्या-यांत 'देव व भक्त एकत्र आले तरी संत ते संत व देव ते देव राहतात', असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे : "भक्त जरी देवाशीं ऐक्य पावला तरी तो

भक्तच राहतो. वारा गगनांत शांत झाला तरी, तो हलला कीं तो गगनाहून निराळा असल्याचें आपल्यास दिसून येतें; नाहीं तर तो गगनाशीं एकरूप असतो, त्याप्रमाणें जोंपर्यंत शारीरिक कर्मे करावयाचीं आहेत, तोंपर्यंत भक्त हा भक्तच राहतो. तो अंतःप्रचीतीनें मद्रूपच झालेला असतो व त्या आत्मबोधाच्या प्रकाशानें त्यास आपण आत्मा आहों असें कळतें." म्हणून आनंदभरानें मीहि म्हणतों कीं, 'मी तो आहें.' देहातीत चिन्हांचें ज्ञान ज्यास होतें व त्यामुळें जो जिवंत राहतो, तो शरीर भिन्न असलें तरी, त्या चिन्हांपासून अभिन्नच राहतो." ( ज्ञा., ७, ११४-१८. ) वांसरूं तनु-मन-प्राणांनीं गाईवर ममता करतें व गाय पाहतांच तिच्याकडे धांवतें आणि गायहि तशीच प्रीति वत्सावर करते. त्याप्रमाणें ज्या मानानें व जितक्या उत्कटतेनें भक्त देवावर प्रेम करतो, त्याच मानानें व तितक्याच उत्कटतेनें देवहि भक्तावर प्रेम करतो. मला एकदां जाणल्यावर भक्त मागें फिरून पाहावयासहि विसरतो. सरिता एकदां गंगेस मिळाली, म्हणजे माघारें उलटणें तिला अशक्य होतें. त्याची अनुभवगंगा अंतःकरणांत उगम पावून एकदां मला येऊन मिळाल्यावर तो मद्रूपच होतो. तोच खरा ज्ञानी होय." ( ज्ञा., ७, १२१-२६. )

### जीवन्मुक्ति

इहलोक सोडण्यापूर्वींच संत देवाशीं पूर्णपणें एकरूप होतात, असें आणखी कांहीं ठिकाणींहि ज्ञानेश्वरांनीं प्रतिपादिलें आहे : " भक्तानें देहाशीं तादात्म्य पावण्याचें नाकारल्यामुळें देहाचा त्याग करावयाचा झाल्यास त्यास वियोग-दुःख मुळींच होत नाहीं किंवा देहाचा त्याग केल्यावरच तो मला येऊन मिळतो, असेंहि यावरून सिद्ध होत नाहीं. कारण, भक्त जिवंत असतांच माझ्याशीं समरस झालेला असतो. आत्मा म्हणजे केवळ स्वयंसिद्ध चंद्रप्रकाश नसून तो विश्वात्मरूप चंद्रापासून निघणारा प्रकाश आहे हें ज्ञान त्यास प्राप्त झालेलें असतें. याप्रमाणें जिवंत असतांच एकरूप झाल्यामुळें मरणानंतरहि तो मद्रूपच होतो." ( ज्ञा., ८, १३६-१३९. ) " जिवंतपणीं जे देवतांची पूजा करतात ते मृत्यूनंतर देव होतात, पितरांची पूजा करतात ते पितृरूप होतात व

जारण–मारणादि क्रिया करण्यासाठीं जे क्षुद्र देवतांची वा भुतांखेतांची उपासना करतात, त्यांच्या देहाचा पडदा पडतांच त्यांस भूतत्व प्राप्त होतें. परंतु जे डोळ्यांनीं मलाच पाहतात, कानांनीं माझेंच गुणवर्णन ऐकतात, मनानें माझीच कल्पना करतात, वाचेनें माझेंच वर्णन करतात, सर्वांगांनीं सर्व ठिकाणीं मलाच नमस्कार करतात, माझ्यासाठींच दान–पुण्यादिक करतात, माझेंच सतत अध्ययन करतात, अंतर्बाह्य माझ्याच रूपानें भरून गेलेले असतात, माझ्याच प्राप्तीसाठीं ज्यांनीं जन्म घेतलेला असतो, हरीचे भक्त म्हणून जे मोठ्या अभिमानानें मिरवितात, ज्यांना या जगांत फक्त माझाच लोभ आहे, जे माझ्या कामामुळेंच सकाम व माझ्या प्रेमामुळें सप्रेम झालेले असतात, जे माझ्यामुळें भुललेले असतात, मीच ज्यांच्या शास्त्रांच्या अभ्यासाचा विषय, माझे मंत्र हेच ज्यांचे मंत्र, याप्रमाणें ज्यांच्या सर्व प्रवृत्तींचा व कार्यांचा विषय मीच असतों, असे माझे भक्त मरणाच्या अलीकडेच म्हणजे मरणापूर्वींच माझ्या स्वरूपांत मिळून गेलेले असतात. ते मरणानंतर माझ्याबाहेर दुसरीकडे जातील कसे ?" ( ज्ञा., ९,३५५–६५. ) याप्रमाणें भक्तांच्या जिवंतपणींच देव व भक्त यांचें पूर्णतया ऐक्य होतें.

## देवाशीं ऐक्य संपादण्याचीं साधनें

याप्रमाणें देवाशीं पूर्ण ऐक्य मिळवावयाचें झाल्यास साधकानें कोणता मार्ग स्वीकारावा याचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं अठराव्या अध्यायांत केलें आहे : " तुझें सर्व अंतर्बाह्य माझ्या व्यापारानें भरून टाक. मला सर्वव्यापी मान. आकाशाच्या सर्व अंगीं वायू मिळून असतो, त्याप्रमाणें तुझ्या सर्व कर्मांमध्यें तूं माझ्याशीं मिळून अस. मला तुझ्या मनाचें राहण्याचें एकमेव स्थान कर. माझ्या कीर्तीच्या श्रवणानें तुझे कान भरूं देत. आत्मज्ञानानें शुद्ध व माझींच रूपडीं असे जे संत त्यांच्यावर तुझी दृष्टि एखाद्या कामिनीवर कामुकाची दृष्टि जडावी त्याप्रमाणें प्रेमानें जडूं दे. तुझी वाचा माझ्या नामावरच जिवंत राहूं दे. हातांचें करणें व पायांचें चालणें इत्यादि माझ्यासाठींच असूं दे. तूं दुसऱ्यावर जे उपकार करशील, ते मला अर्पिलेली आहुति असें समज. यामुळें भूतमात्रांविषयींचा द्वेष नाहींसा होईल. तुझ्या सर्व नमस्कारांचा मीच एक विषय होईन.

यामुळें तुला माझ्यामध्यें शाश्वत जीवन प्राप्त होईल. मग या भरल्या जगामध्यें तूं आणि मी यांशिवाय तिसऱ्यास जागाच राहणार नाहीं. तूं व मी पूर्ण एकांतांत राहूं. या अनिर्वचनीय स्थितींत तूं माझा व मी तुझा आनंद उपभोगूं. यामुळें तुझा आनंद वाढेल. आपणांस प्रतिबंध करणारें तिसरें नाहींसें झालें म्हणजे शेवटीं तूं मीच होशील व मला येऊन मिळशील. वाऱ्यास आकाशभर वावरण्यास व लाटांना सागरास मिळण्यास कोण बरें प्रतिबंध करणार ? तुझ्या-माझ्यामध्यें जो भेद दिसतो, तो देहधर्मामुळें होय; त्याचा नाश झाला कीं तूं मूलतः मीच आहेस.” ( ज्ञा., १८, १३५३-६७. )

## ऐक्यानुभव घेतलेल्या संतांचें वर्णन

देवाशीं एकरूप झालेल्या संतांचें बाह्य वर्तन कसें असतें याचें वर्णन ज्ञानेश्वरांनी असें केलें आहे : “ मी ज्याच्या हृदयांत क्षेत्रसंन्यासी होऊन राहिलों तो झोंपेंत देखील पूर्ण विरागी असतो, हें सर्वांस माहीत असतें. तो ज्ञान-गंगेंत नहाला आहे. पूर्णतेचें जेवण जेवून तो तृप्त झाला आहे. त्याचें जीवन म्हणजे शांतीस फुटलेली पालवीच होय. तो धैर्य-मंडपाचा आधार-स्तंभच होय. तो आनंद-समुद्रांत हलवून भरलेला घटच होय. त्याची लीला म्हणजे नीतिमार्ग. त्याचें मन म्हणजे माझी थैली. तो वाढत्या प्रेमानें माझें भजन करतो. त्याच्यामाझ्यामधील भेद नाहींसा झालेला आहे. तो माझ्याशीं एकजीव झाला असला तरीहि दुसऱ्यांप्रमाणेंच माझी सेवा करीत राहतो. ” ( ज्ञा., ९, १८६-९६. ) भक्ति-ज्ञानांच्या संयोगामुळें तो माझ्यांत मिसळून माझ्याशीं एकरूप झाला आहे. एका आरशापुढें दुसरा आरसा ठेवला, तर कोणता आरसा कोणत्याचें प्रतिबिंब समजावा ? तरुण स्त्री तारुण्य उपभोगते, त्याप्रमाणें तो मद्रूप झाला असला तरी माझा आनंद अनुभवतो. अद्वैतांतहि भक्ति आहेच, हीं गोष्ट प्रत्यक्ष अनुभवावयाची आहे, बोलावयाची नव्हे. पूर्वकर्मानें तो कांहीं बोलला किंवा त्यानें कांहीं कर्म केलें, तर तें वस्तुतः मी त्याच्यासाठीं करीत असतों. प्रलयकालीं चोहोंकडेच पाण्याचा दाब बसल्यानें पाणी वाहीनासें

होतें, त्याप्रमाणें तो सर्वांगीं सर्वस्वीं आत्म्यानें भरून जातो व माझ्याशीं समरस झाल्यामुळें त्याची हालचाल थांबते. ही त्यानें केलेली माझी अद्वैत–यात्राच होय. तो बोलेल तें माझें स्तवन व तो पाहील तें माझें दर्शन. तो चालतो तेव्हां मी चालतों. त्यानें केलेलें कर्म म्हणजे माझी पूजा व तो ध्यान करतो ती माझी प्रार्थना. त्याची झोंप म्हणजे माझी निर्विकल्प समाधि. कंकण व सोनें अभिन्न असतात, त्याप्रमाणें त्याच्या भक्तियोगानें तो माझ्याशीं अनन्य असतो. पाणी व लाटा, कापूर व वास, हिरा व तेज हीं जशीं एकच असतात, त्या-प्रमाणें तो माझ्याशीं एकरूप असतो. ( ज्ञा., १८, ११३०-८३. )

## स्वानंदप्राप्ति व तदनंतरचा अनुभव

अशा संतांना स्वानंदाचा अनुभव आल्यावर त्यांच्यामध्यें नवीन जागृति उत्पन्न होते, तिचेंहि वर्णन ज्ञानेश्वरांनीं केलें आहे : “ अज्ञान सरून गेलें म्हणजे यज्ञ करणारा व यज्ञ एक होतात. आत्मसामरस्याचें अवभृत स्नान केल्यावर झोंपेंतून जागा झालेल्या मनुष्याप्रमाणें तो उठतो व म्हणतो कीं आपण हें स्वप्न अनुभवीत असतां स्वप्नांतील विविध रूपें आपणच धारण केलीं होतीं व स्वप्नांत पाहिलेलें सैन्य खरें सैन्य नसून, तें आपल्या आत्म्याचेंच रूप होतें. ” ( ज्ञा., ९, २४४–४७. ) “ आणि तो ध्यानास बसला म्हणजे नगाऱ्याचा जयजयकार–ध्वनि ऐकतो, त्याचयावर ऐक्याचें अद्वितीय निशाण फडकूं लागतें व आत्मानुभव–राज्याच्या सामरस्य–सिंहासनावर समाधि–श्रीला बसवून त्याचा पट्टाभिषेक होतो. ” ( ज्ञा , ९, २१७ -१८. )

## ऐक्याच्या निवेदनानें ऐक्य-प्राप्ति

अठराव्या अध्यायाच्या शेवटीं ज्ञानेश्वरांनीं सामरस्य–प्रेमाचें वर्णन एका सुप्रसिद्ध परिच्छेदांत केलें आहे. तेथें संजय धृतराष्ट्राला कृष्ण व अर्जुन यांच्या सामरस्याचें वर्णन करीत आहे व हें वर्णन करीत असतां तो ऐक्य–भावनेनें इतका वाहवून जातो कीं, तो स्वतः देखील त्या दोघांशींहि समरस होतो ! श्रीकृष्णअर्जुनांच्या प्रेमनद्यांच्या संगमांत संजय मिठाच्या बाहुलीप्रमाणें पडला

व त्या संगमाच्या पाण्यांत पूर्णपणें विरून गेल्यामुळें त्या दोघांच्या प्रेमाशीं अभिन्नच राहिला. संजय म्हणाला, " हे धृतराष्ट्रा, पूर्व व पश्चिम सागरांमध्यें फक्त नांवाचाच फरक आहे; वस्तुतः पाहतां दोहोंमधील पाणी एकच असतें. शरीरांकडे पाहतां श्रीकृष्ण व अर्जुन भिन्न दिसत होते; परंतु आत्मसंगमाकडे पाहतां ते पूर्णपणें एकच होते. श्रीकृष्ण व अर्जुन समोरासमोर ठेवलेल्या दोन स्वच्छ आरशांप्रमाणें होते व एकाचीं अनंत प्रतिबिंबें दुसऱ्यांत पडत होतीं. अर्जुनानें श्रीकृष्णासह आपणास श्रीकृष्णामध्यें पाहिलें, श्रीकृष्णानें अर्जुनासह आपणास अर्जुनामध्यें पाहिलें व संजयानें त्या दोघांना एकदम एकत्र पाहिलें ! श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यामध्यें जर भेद नसता तर त्यांचा संवाद अशक्य झाला असता; त्यांच्यामध्यें भेद असता, तर समरसता अशक्य झाली असती. संजयानें त्यांचा संवादहि ऐकला व सामरस्यहि पाहिलें. तथापि श्रीकृष्ण व अर्जुन एकरूपच होते. एक आरसा दुसऱ्यापुढें ठेवला तर बिंब व प्रतिबिंब यांमधील भेद नाहींसा होतो. एक आरसा दुसऱ्यापुढें ठेवला तर कोणता कोणास प्रतिबिंबित करील ? समजा, एका सूर्यापुढें दुसरा सूर्य ठेवला, तर प्रकाशक कोण व प्रकाश्य कोण ? अशा प्रसंगीं द्वैताचा निर्धार करणें व्यर्थ आहे. एकत्र मिळालेल्या दोन उदकांमधील भेद सांगण्यास मीठ गेलें, तर तें क्षणार्धांत त्या दोन्ही पाण्यांत विरून जातें, त्याप्रमाणें ' कृष्ण व अर्जुन एकरूप झाले तेव्हां मीहि त्यांच्यांत समरस होऊन गेलों ' असें संजय म्हणाला. " याप्रमाणें तो बोलत असतां आनंदातिशयानें त्याचें हृदय भरून आलें व अष्ट सात्त्विक भावांमुळें त्याची संजयपणाची जाणीवहि नाहींशी होऊन त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले ! तो निश्चेष्ट खालीं पडला व त्यास दरदरून घाम सुटला; त्यानें वरील दोन्ही भावनांस जिंकलें. अद्वयानंदाच्या स्पर्शानें त्याची दृष्टि रसमय झाली व त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. हे अश्रू म्हणजे खरे अश्रू नसून मूर्तिमंत प्रचीतीच द्रवरूपानें वाहत होती ! त्याच्या पोटांत कांहींच, कोणताच भाव, मावेना. त्याचा कंठ सद्गदित झाला व त्याच्या तोंडावाटे शब्द उमटेनात." (ज्ञा., १८, १५८९–१६०६.)

# उपसंहार

## ज्ञानेश्वरीचा उपसंहार

ज्ञानेश्वरीच्या उपसंहारांत ज्ञानेश्वरांनीं दोन परिच्छेदांत पुढील दोन महत्त्वाच्या गोष्टी सांगितल्या आहेत : (१) परमेश्वर ज्याचा सहकारी झाला त्याचा विजय हा नेहमीं ठरलेलाच असतो व ( २ ) परमेश्वर विजयरूप असल्यामुळें तो ज्या बाजूस हजर असेल त्या बाजूचा विजय कोणत्याहि परिस्थितींत झालाच-पाहिजे. कौरवांचा पिता धृतराष्ट्र यास कौरव व पांडव यांच्यामध्यें होत असलेल्या युद्धाचा निकाल कसा लागेल याबद्दल काळजी वाटत होती म्हणून त्यानें संजयास ' शेवटीं कोणऱ्या पक्षाचा जय होईल ? ' असें विचारलें, तेव्हां ' श्रीकृष्ण ज्या पक्षांत आहे त्या पक्षाचा जय झालाच पाहिजे ' असं संजयानं धृतराष्ट्रास निःसंकोचपणें सांगितलें. " जेथें चंद्र तेथं चांदणें असतं, जेथं शंभु तेथें अंबिका असते, जेथें संत तेथें विवेक असतो; जेथं राजा तेथं सैन्य असतं, जेथें सौजन्य तेथें मैत्री असते, जेथें वाह्नि तेथें दाहक सामर्थ्य असतें, जेथें दया तेथें धर्म असतो, जेथें धर्म तेथें सुख असतें व जेथें सुख तेथें पुरुषोत्तम असतो. वसंतांत वनें, वनांत सुमनें व सुमनांभोंवतीं भ्रमरांचे समुदाय असतात. जेथें गुरु तेथें ज्ञान असतें, ज्ञानांत आत्मदर्शन असतें व आत्मदर्शनांत आनंद असतो. जेथें भाग्य तेथें विलास असतो, जेथें सुख तेथें उल्हास असतो, जेथें सूर्य तेथें प्रकाश असतो, जेथें श्रीकृष्ण तेथें लक्ष्मी असते व जेथें लक्ष्मी तेथें तिच्या अणिमादिक सर्व दासी असतात. श्रीकृष्ण मूर्तिमंत विजय आहे. तो ज्यांच्या मागें राहील त्यांचा जय निश्चितपणें आहेच. जेथें श्रीकृष्ण व त्याचा भक्त पार्थ हे असतील, तेथील झाडें देखील स्वर्गांतील कल्पवृक्षास जिंकतील, तेथील सर्व दगडहि चिंतामणि होतील, तेथील भूमि सुवर्णमय

होईल व तेथील नद्यांतून अमृत वाहील. श्रीकृष्ण व लक्ष्मी ज्याचीं मातापितरें झालीं त्याचें बडबडणेंहि वेदरूप होईल; मग तो सदेह सच्चिदानंद कां होणार नाहीं? मेघ समुद्रापासूनच उत्पन्न झालेला असला तरी तोच लोकांना समुद्रापेक्षां जास्त उपयुक्त ठरतो, त्याप्रमाणें जगास अर्जुनच श्रीकृष्णापेक्षां जास्त उपकारक ठरला परिसानें लोखंडाचें सोनें होतें, परंतु व्यवहारांत जग सोन्यासच जास्त महत्त्व देतें! पण यामुळें गुरूचें महत्त्व कांहीं कमी होत नाहीं. कारण वह्नि दीपाच्या रूपानें प्रकाशत नाहीं काय? शिवाय, मुलानें सर्व गुणांत आपला पराभव करावा अशीच बापाची विशेष इच्छा असते. अर्जुन आहे तेथें विजयहि आहेच; कारण, तो देवाचा फार आवडता भक्त आहे. धृतराष्ट्रा, व्यासाच्या वचनावर तुझा विश्वास असेल, तर मी सांगतों त्यावर विश्वास ठेव: 'जेथें श्रीवल्लभ आहे, तेथें भक्तांचा समुदाय असतो व तेथें सुख व मंगल यांचाहि लाभ असतो.' हे माझे शब्द खोटे ठरले तर व्यासांचें शिष्यत्व मी सोडून देईन", असें आपले दोन्ही हात उभारून संजय गर्जून म्हणाला. (ज्ञा., १८, १६३३–५९.) ज्ञानेश्वरीच्या उपसंहारात्मक दुसऱ्या परिच्छेदांत ज्ञानेश्वरांनीं पुढीलप्रमाणें प्रसाद–दान मागितलें आहे: "माझ्या या वाग्यज्ञानें विश्वात्मक देव संतुष्ट होवो व संतुष्ट होऊन मला हें प्रसाददान देवो!—दुष्टांचा दुष्टपणा नाहींसा होऊन त्यांची चांगल्या कर्माविषयींची आवड वाढो! जगांतील सर्व प्राणिमात्रांमध्यें मैत्री नांदो! पातकांचा अंधार नाहींसा होवो! सर्व विश्वास स्वधर्मसूर्याचा प्रकाश मिळो! जो जो प्राणी जें जें वांछील तें तें सर्व त्यास मिळो! सर्व मंगलांचा वर्षाव करणारे संतांचे समुदाय पृथ्वीवरील प्राणिमात्रांस सदैव व अखंड भेटोत! ते खरोखरीं कल्पवृक्षांचे हालते–चालते बगीचेच आहेत, चिंतामणींची जणूं जिवंत खाणच आहेत, अमृताचे बोलते सागरच आहेत, कलंकरहित चंद्र व तापरहित सूर्यच आहेत! ते संत सदा सर्वांचे सोयरे होवोत! किंबहुना, तिन्ही लोक सर्व सुखांनीं पूर्ण होऊन आदिपुरुषास अखंड भजूं देत. या ग्रंथावर जे जिवंत राहतील, त्यांना दृष्टादृष्ट सर्व विषयांत विजय मिळो! श्रीविश्वेश्वर या विनंतीस 'होय, हें प्रसाददान तुला मिळेल!' असें म्हणाले व या वरदानानें ज्ञानेश्वर सुखी झाले (ज्ञा., १८, १७९४–१८०२)

# आमचें प्रकाशन

( शिल्लक नसलेल्या पुस्तकांची किंमत दिलेली नाहीं. )

* १–२ **सत्याचे प्रयोग** ( द्वितीयावृत्ति ) : म. गांधी
* ३ **खादी-मीमांसा** ( द्वितीयावृत्ति ) : बाळूभाई मेहता
४ **स्वराज्य-शिष्टाई** : म. गांधी
५ **संयम कीं स्वैराचार** ? ( खंड १ ला ) : म. गांधी
६ **हिंडलग्याचा प्रसाद** : काका कालेलकर
* ७ **हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : एस्. राधाकृष्णन्
* ८ **उपनिषदांतील दहा गोष्टी** ( तृतीयावृत्ति )
लेखक : शंकरराव देव ०-१२-०
* ९ **विद्यार्थी-जीवन** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : श्री. स. महाजन
*१० **फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास**
लेखक : त्र्यं. र. देवगिरीकर १–४–०
११ **कॉंग्रेसचा इतिहास** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : डॉ. पट्टाभिसीतारामय्या
१२ **समाजवादच कां** ? ( द्वितीयावृत्ति )
लेखक : जयप्रकाश नारायण १–०–०
१३ **खानबंधू** : महादेवभाई देसाई
१४ **जवाहरलाल नेहरू** : आत्मचरित्र (द्वितीयावृत्ति) : पं. नेहरू १२–८–०
*१५ **विश्राम** ( पंचमावृत्ति ) : साने गुरुजी १–८–०
*१६ **भारतीय संस्कृति** ( चतुर्थावृत्ति ) : साने गुरुजी ३–०–०
१७ **प्रसाददीक्षा** : म. गांधी
१८ **भिल्ल साधु गुलामहाराज** : शं. वि. ठकार
*१९ **आधुनिक भारत** : आचार्य जावडेकर
*२० **हिमालयांतील प्रवास** ( तृतीयावृत्ति )
लेखक : काका कालेलकर २–४–०

२१ **गांधीजींचें विविध दर्शन** ( द्वितीयावृत्ति )
संकलनकार : एस्. राधाकृष्णन् २-८-०

*२२ **जिवंत व्रतोत्सव** ( द्वितीयावृत्ति ) : काका कालेलकर ३-१२-०

२३ **गांधी-विचार-दोहन** : किशोरलाल मश्रूवाला

२४ **सत्याग्रही महाराष्ट्र** : प्रेमा कंटक ३-०-०

*२५ **अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : जॉन रस्किन २-०-०

*२६ **जीवन-दर्शन** ( तृतीयावृत्ति )
लेखक : महाकवि खलिल जिब्रान १-१२-०

२७ **ग्रामोद्योगाचें अर्थशास्त्र** : जे. सी. कुमारअप्पा

२८ **बापू** : घनश्यामदास बिडला १-८-०

२९ **संस्कृतीचें भवितव्य** ( द्वितीयावृत्ति ) : एस्. राधाकृष्णन् १-४-०

३० **महात्मा गौतमबुद्ध** : एस्. राधाकृष्णन् १-०-०

३१ **जीवन आणि साहित्य** : आचार्य स. ज. भागवत २-८-०

३२ **प्राचीन साहित्य** : कविसम्राट् रवींद्रनाथ ठाकुर १-८-०

३३ **संयम कीं स्वैराचार ?** ( खंड २ रा ) : म. गांधी १-१२-०

३४ **हिंदु-मुसलमान-ऐक्य** : आचार्य जावडेकर ३-०-०

३५ **गीताहृदय** ( तृतीयावृत्ति ) : साने गुरुजी ०-१२-०

३६ **हिंदूचें समाजकारण** : काका कालेलकर २-४-०

३७ **द्विखंड हिंदुस्थान** : डॉ. बाबू राजेंद्रप्रसाद ११-०-०

३८ **कॉंग्रेस-कथा** ( द्वितीयावृत्ति ) : गो. आ. देशपांडे ४-८-०

३९ **भगवान् बुद्धासाठीं** : शंकरराव देव ३-८-०

४० **आचार्य कृपलानी** : निवडक लेख व भाषणें ३-०-०

४१ **वाल्मिकी-आश्रमांतील प्रवचनें** : आचार्य जावडेकर १-०-०

४२ **संपूर्ण स्वदेशी** : म. गांधी २-४-०

४३ **प्रवासी** : महाकवि खलिल जिब्रान २-०-०

४४ **ज्ञानेश्वरी-अंतरंग** : डॉ. रानडे २-०-०

---

* ही पुस्तकें मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील सरकारी विद्याखात्यांनीं शाळांतील वाचनालयांकरितां व बक्षिसांकरितां मंजूर केलीं आहेत.

# आमच्याकडे सोल-एजन्सीनें असलेलीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १ | राजनीतिशास्त्र—परिचय : आचार्य जावडेकर | ३—०—० |
| २ | आधुनिक राज्यमीमांसा (भाग १ व २) ,, ,, | २—८—० |
| ३ | पुरोगामी साहित्य : ,, ,, | २—०—० |
| ४ | महाराष्ट्र व हिंदी राजकारण : ,, ,, | १—०—० |
| ५ | समाईक सहकारी स्वराज्य : ,, ,, | ०—४—० |
| ६ | लो. टिळक व म. गांधी : | २—०—० |
| ७ | विनोबाजी भावे : साने गुरुजी | १—०—० |
| ८ | देशबंधु दास : ,, ,, | ०-१४—० |
| ९ | स्वराज्यसंस्थापक श्रीशिवराय : साने गुरुजी | ०—४—० |
| १० | रामाचा शेला : साने गुरुजी | ३—०—० |
| ११ | पत्री : साने गुरुजी | ३—८—० |
| १२ | दरबार गोपाळदास : ह. मो. जोशी | ०—२—० |
| १३ | जीवनयोग : ना. ग. जोशी | ०-१२—० |
| १४ | पाकिस्तान : ॲड्. ग. वा. जोशी | १—०—० |
| १५ | त्रिमंत्रि-योजना (भाग १ व २) | २—८—० |
| १६ | हिंदी रेल्वे—कामगार : वि. न. साने | ०-१२-० |
| १७ | डॉ. सन्यत्सेन : वि. म. भुस्कुटे | ३—०—० |
| १८ | साजवा साळी : सुशील परभूत | ३—०—० |

सर्व प्रकारच्या पुस्तकांकरितां प्रथम आमच्याकडे चौकशी करा.

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : टिळक रोड, पुणें २**